






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका



---


संपादक : प्र.ना. परांजपे

संपादन-सल्लागार : अशोक रा. केळकर, मॅक्सीन बर्नसन, अंजली सोमण

संपादन-समिती : प्र.ना. परांजपे (प्रमुख), विजया देव, मृणालिनी शहा, नीलिमा गुंडी

मुखपृष्ठ/विनय सायनेकर, सुप्रिया खारकर

संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके : प्र.ना. परांजपे, सी-१, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे ४११ ००७. दूरध्वनी (०२०) २५६९४६१७

प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा : नीलिमा गुंडी, कार्यवाह, 'मराठी अभ्यास परिषद' ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ७, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११००२. दूरध्वनी (०२०) २४४८६०१५

मुद्रण-स्थळ : भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे ५१. दूरध्वनी (०२०) २४३४८७०६

---

प्रकाशन : त्रैमासिक: जानेवारी(हिवाळा), एप्रिल(उन्हाळा), जुलै(पावसाळा), ऑक्टोबर(दिवाळी)

सूचना : (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.**

**या अंकाचे मूल्य रु. ७०/-**

# साहित्याचे सांस्कृतिक संदर्भ आणि भाषांतर

विल्यम गोल्डिंगच्या 'लॉर्ड ऑफ दी फ्लाइज' या कादंबरीच्या अखेरीस येणाऱ्या ब्रिटिश नाविक अधिकाऱ्याच्या तोंडी एक वाक्य आहे : ("I know, Jolly good show, Like the Coral Island") ''आय नो, जॉली गुडे सो, लाइक द कोरल आयलंड'' या कादंबरीचे जी.ए. कुलकर्णी यांनी मराठी भाषांतर केले आहे. त्यात या वाक्याचे भाषांतर म्हणून पुढील वाक्ये येतात : ''आलं ध्यानात ! तुम्ही येथे सगळी मजाच केली म्हणायची ! प्रवाळ-द्वीपाविषयीच्या पुस्तकात नेहमी असते तशी ! निळे स्वच्छ पाणी, सोनेरी वाळू, पिकलेली रसरशीत, सहज हाताला येणारी फळे, निष्पाप गोड खेळ, नाटके, खोट्या खोट्या लढाया, गोड गोड गाणी ! आणि मग सगळं विसरून एकमेकांच्या गळ्यात गळा घालून चांदण्याखाली गोड स्वप्न पाहात घेतलेली गुलाबी झोप - चांगली चैन केलीत तुम्ही !''

असं का व्हा व्हावं ? एका 'कोरल आयलंड'च्या भाषांतरासाठी जी.एं.ना इतका विस्तार करण्याची आवश्यकता का भासली ?

ललित साहित्याच्या भाषांतरामध्ये येणाऱ्या एका महत्त्वाच्या समस्येचं दर्शन यातून घडते. आणि या समस्येच्या सोडवणुकीचा एक निश्चित, प्रमाण असा मार्ग नाही.

काय आहे ही समस्या ? 'कोरल आयलंड' ही आर.एम. बॅलंटाइन या ब्रिटिश लेखकाची १८५७मध्ये प्रसिद्ध झालेली रोमँटिक कादंबरी आहे. एका बेटावर अडकलेल्या तीन ब्रिटिश मुलांची साहसकथा आहे. त्या कादंबरीचा उल्लेख करून गोल्डिंगने आपल्या कादंबरीला एक संदर्भ-चौकट दिली आहे. गोल्डिंगच्या कादंबरीतही एका बेटावर अडकलेली मुले आहेत; पण त्यांचे वर्तन 'कोरल आयलंड'मधील मुलांच्या-पेक्षा फार भिन्न आहे. स्वार्थ, मत्सर, हेवेदावे, खोटेपणा, अंधश्रद्धा आणि हिंसा यांमुळे ती सुसंस्कृत, शिस्तबद्ध मुले हळूहळू रानटी 'आदिवासी' बनत जातात. 'लॉर्ड ऑफ दी फ्लाइज'मध्ये या बदलाचे धक्कादायक दर्शन होते. मुले निष्पाप असतात, ती 'देवाघरची फुले' असतात, या १९व्या शतकात लोकप्रिय असलेल्या समजुतीला छेद देणारी ही कादंबरी १९५४मध्ये (म्हणजे 'कोरल आयलंड'नंतर ९७ वर्षांनी प्रसिद्ध झाली. आपल्या कादंबरीने वाचकांना 'कोरल आयलंड'ची आठवण व्हावी आणि

त्यांच्यांत व्यक्त होणाऱ्या दृष्टिकोणांमधील विरोध वाचकांच्या लक्षात यावा म्हणून गोल्डिंगने नाविक अधिकाऱ्याच्या तोंडी 'कोरल आयलंड'चा उल्लेख घातला आहे.

ज्या वाचकांनी 'कोरल आयलंड' वाचली आहे त्यांना तिच्या उल्लेखामुळे 'लॉर्ड ऑफ द फ्लाइज' सुन्न करील, अंतर्मुख करील यात शंका नाही. माणूस समजण्याच्या बाबतीत १९व्या शतकातील लोक भाबडे होते का ? दोन महायुद्धांमुळे (लॉर्ड ऑफ दी फ्लाइज'मधील काळ तिसऱ्या महायुद्धाचा आहे.) माणसात मूलभूत फरक पडला आहे का ? स्वार्थ-द्वेष-मत्सर-हेवा व हिंसा यांमुळे माणूस स्वत:चाच नाश ओढवून घेणार आहे का ? असे अनेक प्रश्न त्याला पडतील. त्यामुळे ब्रिटिश वाचकांच्या दृष्टीने 'कोरल आयलंड'चा उल्लेख महत्त्वाचा आहे यात शंका नाही.

पण मराठी वाचकांचे काय ? मराठी वाचकांनी 'कोरल आयलंड' वाचली असेल असे गृहीत धरता येत नाही. मग भाषांतरकाराने हा उल्लेख जशाचा तसा ठेवायचा ? की तो पूर्णत: वगळायचा ? की जी.एं.नी केला आहे त्याप्रकारे त्या उल्लेखाचा विस्तार करावयाचा ? की त्यावर पदटीप देऊन त्याचा अर्थ स्पष्ट करायचा ? या प्रश्नाला सर्वांना मान्य होईल असे एक 'प्रमाण' उत्तर नाही, हे उघड आहे.

'लॉर्ड ऑफ दी फ्लाइज' या कादंबरीचे शीर्षकच पाहा. त्याचे भाषांतर करायचे नाही असा निर्णय भाषांतरकार व प्रकाशकांनी घेतला. बायबलच्या 'सेकंड बुक ऑफ दी किंग्ज्'च्या पहिल्या प्रकरणाच्या दुसऱ्या परिच्छेदात बाल्झेबब (Balwze-bub)चा उल्लेख आहे. हिब्रू भाषेत त्याचा अर्थ 'माश्यांचा स्वामी' असा आहे. खोट्या देवांच्या पैकी तो एक आहे. ग्रीक भाषेत त्याचा अर्थ 'सैतान' असा आहे. ('न्यू टेस्टामेंट'-मधील मॅथ्यूच्या पुस्तकातील १२व्या प्रकरणात परिच्छेद २४ व २७मध्येही बील्झेबबचा उल्लेख आहे.) कादंबरीत मृत वैमानिकाच्या प्रेतावर माश्या घोंघावत आहेत आणि पॅरॅशूटमध्ये अडकलेले ते प्रेत वाऱ्यामुळे मागेपुढे हलताना दिसते. त्यालाच मुले 'लॉर्ड ऑफ दी फ्लाइज' समजतात. त्याला प्रसन्न करण्याचे बेत आखतात. अर्थात हा 'माश्यांचा स्वामी' म्हणजे मुलांच्या मनातील भीतीचेच प्रतीक आहे. (देवांचा जन्म अशा गूढ अनामिक भीतीतूनच होतो.)या शीर्षकाला असलेला बायबलचा संदर्भ लक्षात यावा म्हणून इंग्रजी शीर्षकात बदल करण्यात आला नसावा. (अर्थात याचे भाषांतर 'सैतान' असे होऊ शकते आणि मुलांच्या मनात जाग्या होऊ पाहणाऱ्या दुरिताचा तो अन्वर्थक ठरू शकतो. शिवाय सैतान या शब्दाला ख्रिश्चन धर्माचा-पर्यायाने बायबलचा - संदर्भ आहे. पण ते शीर्षक फार भडक ठरण्याचा धोका आहे.) साहित्यात मुरलेले सांस्कृतिक संदर्भ भाषांतरकारापुढे समस्या निर्माण करतात त्या अशा ! ■

प्र. ना. परांजपे

**आदरांजली**

# रकृ

**विनय सायनेकर**

शतकांपूर्वी निबिड अरण्यातील आश्रमांतून उच्चारल्या गेलेल्या वेदमंत्रांच्या उच्चारातील आणि त्या मौखिक परंपरेतील वैविध्यपूर्ण उच्चारभेदांच्या दृश्यस्वरूपीय प्रतिनिधित्व - शतकांपूर्वी प्रस्तरांवर खोदल्या गेलेल्या... ताम्रपटांवर, ताडपत्रांवर कोरल्या गेलेल्या... भूर्जपत्रांवर कागदांवर लिहिल्या गेलेल्या विविध भारतीय लिप्यांतील अक्षरांची वळणं-वाकणं-अलंकरणं यांचा स्वत:ला आणि नेहमीच व्याधींना विसरून संशोधन करणारा अभ्यासक कलावंत; अभ्यासलेल्या अक्षराकारांना कलासक्त मनाने नवजीवन देणारा सुलेखक; भारतीय सुलेखन परंपरेची पताका कलाशिक्षणाद्वारे आणि अथक परिश्रमाने देशोदशी फडकत ठेवणारा सुलेखक, आलंकारिक शैलीत याच अक्षरांतून रचलेले अर्थवाही अक्षरविभ्रम - विविध भारतीय लिप्यांच्या संगणकीय उपयोगासाठी नव्याने केलेल्या संकल्पनरचना - विविध भाषांतील लिप्या - त्यांच्या शैली- इतिहास - आणि त्यांचं त्या त्या संस्कृतीच्या जडणघडणीतील स्थान- त्याचप्रमाणे बहुरंगी व बहुपेडी सुलेखन-संस्कृतींचं दर्शन समाजाच्या सर्वच घटकांना घडवणारी प्रथमा, आकार, श्रीलेख, अक्षरमार्ग, अक्षरमुद्रा, अक्षरयोग सारखी संकल्पन-नियोजनापासून आयोजन-रचना करणारा प्रदर्शक; विविध भाषांतील लिप्यांतील अक्षरे अनेक कलात्मक मार्गांनी अन्य भाषकांसमोर आणून त्यांचं घडवलेलं सौंदर्य दर्शन - मग ते बोधचिन्ह असो, दैनंदिनी असो, शुभेच्छापत्रे, पत्र लिहिण्यासाठी कागद, अथवा दिनदर्शिका...सर्व भारतीय लिप्यांसाठी एक लिपी... मौखिक भाषाव्यवहार व लिपी यांतील संबंध... असे असंख्य प्रकल्प आयुष्यभर सतत तेवत ठेवणारा; यशस्वी जाहिरात-व्यावसायिक म्हणून जवळजवळ अडीच दशकांच्या कारकिर्दीत लिप्या आणि भाषांचं सौंदर्य घडवत जाहिरातक्षेत्रात मैलाचे दगड मानल्या गेलेल्या जाहिरातींचे संकल्पनकार; आय्.डी.सी.(आय्.आय्.टी) सारख्या मान्यवर संस्थेत अध्यापन आणि विभागप्रमुख म्हणून कार्यरत असताना कलाशिक्षणक्षेत्रावर ठसा उमटवणारे संवेदनशील शिक्षणतज्ज्ञ, अक्षरध्यासाने झपाटून जाता जाता अक्षरसमर्पित विद्यार्थ्यांच्या पिढ्या घडवणारा अक्षरशिक्षक; पथनाट्याच्याच

जातकुळीतला परंतु प्रहाणाऱ्याला आपल्यात सामावून घेत अनवट असा अनुभव देणाऱ्या 'अक्षर वटनांचा' जनक; कवितेच्या आशयाच्या जोडीनेच कवितेचं दृश्यरूप देखील कविता-आस्वादनाच्या अनेक पातळ्यांवर अनुभवू देणारा दृश्य कवितांचा कवी; संगणकीय तंत्रज्ञानाचा उपयोग अक्षराभिसरणासाठी करत - मुद्राक्षर संकल्पनासाठी 'विन्यास' आणि शब्द तसेच मजकुराच्या संपादनासाठी 'विविधा', 'विदूरा'सारखी सॉफ्टवेअर्स - त्यांचे संकल्पन, नियोजन व निष्पादन; वेदोच्चारांतील उच्चारभेदांवर विशेष संशोधन आणि त्यांचे मुद्राक्षर-संकल्पन करणारा अभ्यासू कलावंत; अक्षरांच्या संदर्भात देशी-विदेशी चर्चासत्रांत आदराने आमंत्रित केलेला विद्वान; अक्षरांचं अध्ययन, संशोधन, चिंतन-मनन, उपयोजन आणि ध्यास घेतलेलं... अशा अनेकविध पैलूंनी पाच दशके बहरलेलं - आणि तरीही काही अंगुळे नक्कीच उरणारं व्यक्तिमत्त्व रकु जोशी (१९३६-२००८) आणि त्या पैलूदार व्यक्तिमत्त्वाला गवसणी घालण्याचा या एका वाक्याचा हा प्रयत्न. ■

तिसरा मजला, निलेश अपार्टमेंट, रा.शं. मार्ग, चेंदणी-ठाणे (प.) 400601
दूरध्वनी : 9819192181

**पत्रिकेबद्दल वार्षिक निवेदन**

'मराठी अभ्यास परिषद पत्रिका' या नियतकालिकाची मालकी व इतर बाबी यांच्या संबंधी वृत्तपत्रे आणि पुस्तकनोंदणी अधिनियम, कलम डी १९(बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रीय) नियमावली १९५६, नियम ८, नमुना ४, यांना अनुसरून केलेले निवेदन.

१) **प्रकाशन स्थळ** : पुणे, महाराष्ट्र
२) **प्रकाशनाची कालनियतता** : **त्रैमासिक** : जानेवारी (हिवाळा), एप्रिल (उन्हाळा), जुलै (पावसाळा), ऑक्टोबर (दिवाळी).
३) **प्रकाशक व मुद्रकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता** : नीलिमा गुंडी, भारतीय, कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद. ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, पुणे ४११००२.
४) **मुद्रणस्थळ** : भंडारी मुद्रणालय, आनंदनगर, सिंहगड मार्ग, पुणे ४११०५१.
६) **संपादकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता** : प्र.ना. परांजपे, भारतीय, सी-१, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे ४११००७.

मी, नीलिमा गुंडी, असे प्रतिज्ञापूर्वक सांगते की, वर दिलेला तपशील माझ्या माहिती आणि समजुतीप्रमाणे खरा आहे.

**नीलिमा गुंडी** कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद (प्रकाशक)








# सामाजिक संदर्भात भाषेचा अभ्यास
## (उत्तरार्ध)

- विल्यम लबव

भाषांतर : मिलिंद मालशे आणि विवेक भट

## समाजलक्ष्यी भाषिक संरचना

*समाजलक्ष्यी भाषिक चलघटका*ची व्याख्या करायची झाली तर पुढीलप्रमाणे करता येईल : बोलणारी व्यक्ती, जिला उद्देशून बोलले जाते ती व्यक्ती, ऐकणारी व्यक्ती, पार्श्वभूमी इत्यादींशी म्हणजेच सामाजिक संदर्भांशी संलग्न असणारा भाषाबाह्य असा चलघटक, अशी ही व्याख्या होईल. काही भाषावैशिष्ट्ये (यांना *दर्शकचिन्हे* म्हणता येईल) ही सामाजिक-आर्थिक गट, वांशिक गट व समवयीन व्यक्तींचे गट यांमध्ये सारख्याच प्रमाणात विभागालेली दिसतात. परंतु प्रत्येक व्यक्ती कोणत्याही संदर्भात या वैशिष्ट्यांचा उपयोग जवळजवळ सारख्याच प्रकारे करीत असते. त्यामधील सामाजिक संदर्भांची (सामाजिक-आर्थिक गट किंवा समवयीन व्यक्तींचे गट) अशा अनुषंगाने काही श्रेणीव्यवस्था रचता आली तर त्या दर्शकचिन्हांचे स्तरीकरण झाले असे म्हणता येईल. अधिक विकसित असे समाजलक्ष्यी भाषिक चलघटक (यांना *व्यवच्छेदक चिन्हे* म्हणता येईल) हे भाषाबदलाची केवळ सामाजिक विभागणीच नव्हे तर शैलीनिहाय भेदसुद्धा दाखवतील. शैलीच्या संदर्भाची रचना एका परिमाणावर आधारित अशी करता येईल : हे परिमाण म्हणजे बोलणाऱ्या व्यक्तीने आपल्या बोलण्याकडे किती अवधान दिले आहे. आपण हे आधी पाहिलेच आहे. त्यामुळे आता आपल्याला सामाजिक-दृष्ट्या तसेच शैलीदृष्ट्याही समाजाचे स्तरीकरण झाले असे म्हणता येईल. फिशर (1958) किंवा कुचेरा (1961) यांच्यासारख्यांच्या प्रारंभिक संशोधनात एका वेळी एकच परिमाण वापरून चलघटकांचे निरीक्षण झालेले होते; परंतु अलीकडील संशोधनामध्ये (लबव, 1966; वोल्फ्रॅम, 1969; अॅन्शन, 1969) दोन्ही परिमाणांमधील परस्परसंबंधही विचारता घेतलेले आहेत.

**स्थिर स्वरूपाचे समाजलक्ष्यी भाषिक व्यवच्छेदक चिन्ह** (th) :

इंग्लिशच्या बाबतीत एक अगदी सर्वसामान्यपणे आढळणारे व साधेसे समाजलक्ष्यी भाषिक व्यवच्छेदक चिन्ह म्हणजे (th) : thing, think इत्यादी शब्दांमधील अघोष दंतमूलीय घर्षक[१] असणारा ध्वनी. त्याचे प्रतिष्ठित रूप सर्वत्र घर्षक आहे; घर्षस्फुट

आणि स्फोटक ही त्याची स्वनरूपे सामाजिकदृष्ट्या कमी दर्जाची मानली जातात. ज्या भाषांमध्ये हा दंतमूलीय घर्षक ध्वनी नाही अशा भाषांच्या प्रभावामुळे अमेरिका या देशातील विविध मोठ्या शहरांमध्ये त्याचप्रमाणे अँग्लो-आयरिश व नॉनस्टँडर्ड नीग्रो इंग्लिश(एन.एन.ई.)मध्ये स्फोटक स्वनरूप विकसित झाले असावे. शिवाय इंग्लंड व अमेरिकेतील इतर बऱ्याच ग्रामीण व शहरी भागांत हा भाषिक चलघटक सापडतो. निदान गेली दोन शतके तरी, बहुधा अधिकही काळ, या स्फोटक स्वनरूपाला साधारणत: घर्षकाचाच दर्जा लाभलेला आहे असे दिसते.

या भाषिक चलघटकाची व्याख्या करताना बरेच तांत्रिक प्रश्न उपस्थित होतात, ते सोडवण्याचा सर्वात सोपा मार्ग म्हणजे शब्दाच्या फक्त आद्यस्थानाचा विचार करणे. स्फोटक (t) साठी दोन गुण, घर्षस्फुटासाठी एक गुण आणि प्रतिष्ठित वापरातील घर्षकासाठी शून्य गुण धरून तयार केलेला एक संख्यादर्शक आपण येथे वापरणार आहोत. स्फोटकाचा नित्य उपयोग केला तर २०० गुण होतात; प्रतिष्ठित रूपाचा नित्य उपयोग केला तर ०० गुण होतात. शैली व सामाजिक श्रेणी अशा दोन्ही निकषांनुसार न्यूयॉर्क शहराची होणारी विभागणी (पुढील पानावरील) आकृती क्र. १ या एकाच आकृतीमध्ये दाखविता येते (लबव, 1966:260). उभ्या अक्षावर (th)चा संख्यादर्शक आणि आडव्या अक्षावर संदर्भानुसार शैली आहे व त्यात अगदी अनौपचारिक शैली डाव्या टोकाला व अगदी औपचारिक शैली उजव्या टोकाला आहे; औपचारिक व अनौपचारिक शैलींचे वर्णन या आधीच्या एका छेदकात आलेले आहे. पाच वेगवेगळ्या आर्थिक-सामाजिक गटांच्या बाबतीत वर्णन केल्याप्रमाणे (th)साठी मिळणारी सरासरी गुणसंख्या आकृतीत मांडून नंतर प्रत्येक गटाची गुणसंख्या सरळ रेषांनी जोडली आहे.

अशा तऱ्हेने आकृती १ ही (th) या घटकाबाबत समाजाची नियमित स्वरूपाची श्रेणीनिहाय विभागणी दर्शविते.

अशा समाजलक्ष्यी भाषिक संरचनांपैकी ही केवळ एक संरचना झाली; इतर अनेक गटनिहाय गुणधर्म पुढील आकृतीवरून स्पष्ट होतात :

सामाजिक - आर्थिक वर्ग

| | |
|---|---|
| ०-१ निम्न वर्ग | ५-६, ७-८ निम्न मध्यम वर्ग |
| २-४ कष्टकरी वर्ग | ९ उच्च मध्यम वर्ग |

आकृती १ : शैली व सामाजिक निकषांनुसार न्यूयॉर्क शहरात thing, thrice इ. शब्दांत आढळणारे (th)च्या चलघटकाचे स्तरीकरण

आकृती १ :




(१) प्रत्येक संदर्भात भाषिक समूहातील सदस्यांचे परस्परांपासूनचे वेगळेपण त्यांच्या (th)च्या उच्चारावरून दिसून येते,

(२) आणि तरीसुद्धा (th)च्या उच्चारातील शैलीबदलाबाबत आकृतीतील रेषांचे उतार साधारणपणे समांतर आहेत, व त्यावरून प्रत्येक समूहाच्या भाषिक वर्तनातील साम्य दिसते.

(३) समूहातील सदस्यांना आकृती १ चे समग्र रूप दिसत नसल्याने वरील (१) व (२) ही तथ्ये सामान्यपणे त्यांच्या ध्यानात येत नाहीत. कोणत्याही एका व्यक्तीला दिसणारा आकृती १ चा भाग म्हणजे एक उभा एक आडवा छेद : म्हणजेच त्याच्या स्वत:च्या समूहाने वापरलेल्या शैलीबदलाची कक्षा आणि काही थोड्या संदर्भात त्या व्यक्तीचा ज्या अन्य समूहांशी संबंध येतो त्या समूहांचे श्रेणीनिहाय भाषिक वर्तन. स्वत:प्रमाणे इतर व्यक्तीही तशाच प्रकारचे शैलीबदल करतात याची जाणीव त्या व्यक्तीला होत नाही.

(४) सामाजिक दर्जा व शैली यांनुसार होणाऱ्या स्तरीकरणाचे निर्देशन भाषेच्या एकाच समाजलक्ष्यी चलघटकाने होत असते. त्यामुळे केवळ कोणत्याही एकाच निरीक्षणावरून निष्कर्ष काढणे कठीण होते; उदाहरणार्थ, एखाद्या विक्रेत्याचे नेहमीचे साधे बोलणे आणि एखाद्या नळ-जोडणी करणाऱ्या कामगाराचे अवधानपूर्वक बोलणे यांत फरक करणे कठीण असते.[८]

(५) एखाद्या उच्चारितात बोलणारी व्यक्ती कोणता भाषिक चलघटक वापरील याचे भाकित करणे अशक्य आहे. मात्र एखादा लहान म्हणजे पाचच व्यक्तींचा समूह आणि प्रत्येक व्यक्तीने एखाद्या शैलीत उच्चारलेली फक्त पाच-दहा वाक्ये एवढ्याच नमुन्यांचा अभ्यास केला तरीही आकृती १वरून दिसणारा निष्कर्षांचा नियमितपणा लक्षात घेण्याजोगा आहे.

आकृती १ मधील रचनेमधून चलघटकासंबंधीच्या नियमावर असणारे बाह्य स्वरूपाचे, भाषेचे समाजलक्ष्यी निर्बंध दिसतात; त्यांचे दिग्दर्शन सूत्र १ वरून होते[१]:

**सूत्र १ :**




या नियमाला आवश्यक असणारी बदलविषयक आदानसामग्री ही सामाजिक-आर्थिक वर्ग आणि शैली यांच्याशी संबंधित आहे, असे सूत्र २ वरून दिसते :

**सूत्र २ :**

$k_0$ = f (SEC, Style) = a (SEC + b (Style) + c

स्थिरांक$_0$=संबंध (सामाजिक-आर्थिक वर्ग, शैली)=अ(सामाजिक-आर्थिक वर्ग)+ब(शैली)+क

आधी उल्लेखिलेल्या संशोधक-गटांनी अभ्यासिलेल्या समाजलक्ष्यी व्यवच्छेदक चिन्हांना हीच सर्वसामान्य लक्षणे लागू पडतात. यांतील बहुतेक संशोधनातून शैलीनुसार झालेल्या सामाजिक स्तरीकरणाचे संपूर्ण चित्र उपलब्ध होत नाही. काही अभ्यासांवरून आकृती १च्या सापेक्षतः लहान लहान भागांविषयी सामग्री मिळते, तर काहीवरून अधिक विस्तृत भागाचा आढावा मिळतो. परंतु अशा सर्व सामग्रीची संगती आकृती १मध्ये दाखविलेल्या आकृतिबंधाच्या कक्षेत लावता येते आणि त्यात ती चपखलपणे बसविता येते.

परस्परांशी खूप मिळत्याजुळत्या आणि समांतर अशा चलघटकांच्या जोडीपैकी (th) हा एक चलघटक आहे. या जोडीतील दुसरा चलघटक म्हणजे this, then यांसारख्या शब्दांत येणारा सघोष, दंत्य घर्षक (dh) हा ध्वनी होय; त्याचा आढळ कोठे होतो याविषयीचे संशोधन न्यूयॉर्क शहराचा सर्वसामान्य स्वरूपाचा अभ्यास (लबव, 1966) आणि नीग्रो भाषिक समूहाचा अभ्यास (लबव व इतर, 1968;

ॲन्दान, 1969) यामध्ये मांडलेले आहे.[१०] आघातहीन उच्चारण असणाऱ्या (ing)च्या बाबतीत – उदाहरणार्थ working, nothing इ.– भाषेचा अगदी असाच समाजलक्ष्यी प्रकार दिसून येतो. जवळजवळ सगळीकडे (in) हा उच्चारभेद अप्रमाण समजला जातो, आणि आकृती क्र. १ (लबव, 1966:398) मध्ये दाखविल्याप्रमाणेच भाषेवर आधारित समाजरचनेची तंतोतंत पुनरावृत्ती येथे झालेली दिसते. याला दुजोरा देणारी सामग्री फिशर (1958) व ॲन्दान (1969) यांनी दिली आहे.

अन्वितीचा (म्हणजे कर्ता व क्रियापद यांच्यातील अन्वयाचा) अभाव आणि सर्वनामांचे समानाधिकरण (म्हणजे त्यांच्या स्पष्टीकरणासाठी समानार्थी शब्दांचा वापर) यांसारख्या शिष्टसंमत नसलेल्या चलघटकांचा अभ्यास डेट्रॉइटमध्ये शूइ, वोलफ्रॅम आणि रीलि (1967) या संशोधकांनी केला. मा आणि हेरासिमशुक (पाहा : फिशमन, 1968) या संशोधकांनी पोर्टो रिकोमध्ये [भा ७] शैलीनिहाय चलघटक तपासले: शब्दाच्या अंत्यस्थानी असणारा (S); (R) म्हणजे r आणि त्यांचे निर्भेदीकरण; (RR) म्हणजे (r:) आणि (y) यांच्या वापरातील अदलाबदल; आणि (D) म्हणजे स्वरमध्यस्थ (d)चा लोप.

भाषेच्या सगळ्याच समाजलक्ष्यी चलघटकांमध्ये न दिसणारी अशीही काही वैशिष्ट्ये आकृती क्र. १मध्ये आहेत. कष्टकरी भाषकसमूह आणि मध्यम वर्गीय भाषकसमूह यांच्या बोलण्यात फार ठळक स्वरूपाची तफावत आढळते. मी या प्रकाराला 'ठळक' सामाजिक स्तरीकरण असे नाव देतो (आणखी माहितीसाठी पाहा : वोल्फ्रॅम 1969: 147). कष्टकरी वर्गातील लोकांचे आणि मध्यमवर्गीयांचे (th)चे उच्चारण यांत काहीच साम्य नाही. परंतु इतर अनेक चलघटकांच्या बाबतीत असे होत नाही. (आकृती क्र. २ पाहा). भाषेचे स्थिर स्वरूपाचे समाजलक्ष्यी व्यवच्छेदक चिन्ह या दृष्टीने पाहता समाजाच्या सामाजिक-आर्थिक स्तरीकरणाच्या एकंदर आकृतिबंधामध्ये सातत्य नाही, असा याचा अर्थ होतो.

**पुरुष व स्त्रिया यांच्या बोलण्यामधील भेद :**

(th)च्या उच्चारणानुसार होणाऱ्या सामाजिक स्तरीकरणाचा आणखी एक पैलू आकृती क्र. १ मध्ये दाखविलेला नाही. काळजीपूर्वक बोलताना अशिष्ट शब्दप्रयोगांचा वापर पुरुषांच्या मानाने स्त्रिया कमी करतात (लबव, 1966: 288), तसेच प्रतिष्ठित भाषेचा वापर करण्याबाबत पुरुषापेक्षा त्या अधिक जागरूक असतात. विशेषत: भाषिक व्यवहाराच्या पटाची अधिक औपचारिक बाजू पाहता स्त्रिया अधिक तीव्र स्वरूपाचा उतार असणारा शैलीबदल दाखवितात. फिशर (1958), शूइ व फासोल्ड (डेट्रॉइटमधील संशोधन), लेविन व क्रॉकेट, व ॲन्दान (हिल्सबरोमधील संशोधन),

या संशोधकांच्या अभ्यासातून वरील निरीक्षणाला अनेक वेळा पुष्टी मिळाली आहे. कनिष्ठ मध्यम वर्गातील स्त्रियांच्या बाबतीत हा प्रकार अधिक प्रकर्षाने आढळतो; कारण या स्त्रिया अशा प्रकारची अगदी टोकाची भूमिका घेताना दिसतात. कनिष्ठ मध्यम वर्गातील स्त्रिया भाषेच्या सामाजिक उपयोगाविषयी अधिक संवेदनशील असतात का, असा एक प्रश्न उपस्थित होतो; परंतु त्याबद्दल स्पष्ट असा पुरावा उपलब्ध नाही.

**कनिष्ठ मध्यमवर्गीयांच्या बोलण्यातील अवाजवी सुधारणा :**

सामाजिक प्रतिष्ठेच्या श्रेणीव्यवस्थेमध्ये दुसऱ्या क्रमांकावर असणाऱ्या लोकांच्या बोलण्यात अत्यंत टोकाचा शैलीबदल दिसतो आणि श्रेणीव्यवस्थेमध्ये प्रथम क्रमांकावर असणाऱ्या लोकांवरही ते या बाबतीत कडी करतात. हे त्यांचे समाजलक्ष्यी भाषिक वर्तनच असते ही बाब अगदी ठामपणे सिद्ध झालेली आहे. हे वर्तन स्पष्ट करण्यासाठी भाषिक बदलाची प्रक्रिया चालू असतानाच तिच्या सामाजिक संरचनेची तपासणी करणे आवश्यक आहे. शब्दाच्या अंत्यस्थानी येणारा (r) आणि व्यंजनापूर्वी येणारा (r) यांचे उच्चार न्यूयॉर्क शहरात कसे केले जातात हे आकृती क्र. २ मध्ये दाखविलेले आहे (लबव, 1966:240).

आकृती क्र. २ :




आकृती क्र. २ guard, car, beer, beard इत्यादी शब्दांमधील (r)च्या उच्चारणावरून दिसणारे न्यूयॉर्क शहरामधील प्रौढ स्थानिक रहिवाश्यांचे सामाजिक वर्गनिहाय स्तरीकरण

या भाषिक समूहाची मूळ स्थानिक बोली ही r विरहित होती; परंतु दुसऱ्या महायुद्धानंतर थोड्याच काळात r चा उच्चार करणे हा प्रतिष्ठेचा निकष बनला. (पूर्वी r चा उच्चार जेथे होत नसे अशा अमेरिकेच्या इतर काही भागांत हीच गोष्ट घडली; परंतु तुलनेने काहीशी कमी प्रमाणात.) ear, where, car, board यांसारख्या शब्दांमध्ये (r) चा संवृत उच्चार होण्याची टक्केवारी म्हणजेच (r) च्या उच्चारणाचा निर्देशांक हा उभ्या अक्षावर दाखविला आहे.[११] अधिक गुणसंख्या ही प्रतिष्ठित मानलेल्या (r)चा अधिक प्रमाणात वापर दर्शविते. उच्चारणाच्या दोन अत्यंत औपचारिक शैलींमध्ये कनिष्ठ मध्यमवर्गातील भाषक उच्च मध्यम वर्गातील भाषकांना झपाट्याने ओलांडून पलीकडे जातात, हे लक्षात घेण्यासारखे आहे. न्यूयॉर्क शहरवासीयांच्या बोलण्यामध्ये इतर कित्येक चलघटकांच्या बाबतीत याच आकृतिबंधाची पुनरावृत्ती होते. या चलघटकाच्या बाबतीत समाजाचे विविध स्तर संख्यात्मक दृष्ट्या कसे जवळ येतात याचे एक अगदी ठळक उदाहरण लेविन आणि क्रॉकेट यांच्या संशोधनामध्ये सापडते; ही जवळ येण्याची प्रक्रिया कोष्टक १ मध्ये दाखविली आहे.

**कोष्टक १ : हिल्सबरो, उत्तर कॅरलायना येथे वाक्ये व शब्दजंत्री तसेच शिक्षण व लिंगभेद यानुसार r च्या उच्चारणाच्या बाबतीत आढळणाऱ्या गुणसंख्येचे कोष्टक**

| | वाक्य-जंत्री | शब्द-जंत्री | निव्वळ वाढ |
|---|---|---|---|
| **शिक्षण** | | | |
| महाविद्यालयीन | ५२.७ | ५८.९ | ६.२ |
| उच्च माध्यमिक शालांत | ५४.३ | ६५.६ | ११.० |
| शालेय | ५०.० | ५७.० | ७.० |
| प्राथमिक किंवा तेवढेही नाही | ५२.६ | ५७.३ | ४.७ |
| **लिंगभेद** | | | |
| पुरुष | ५२.३ | ५७.४ | ५.१ |
| स्त्रिया | ५२.९ | ६१.१ | ८.२ |

(लेवाईन व क्रॉकेट, 1966:223 यावरून)

शैलीबदलाची कक्षा अधिक मर्यादित ठेवून केलेल्या एका पूर्णपणे स्वतंत्र संशोधनातून ही सामग्री घेतलेली आहे. सामाजिक प्रतिष्ठेच्या श्रेणीव्यवस्थेमध्ये दुसऱ्या क्रमांकावर असणाऱ्या भाषकांनी प्रथम क्रमांकावरील भाषकांना ओलांडून पलीकडे जाण्याचा त्याच प्रकारचा आकृतिबंध येथे आढळतो. येथे प्रतिष्ठेच्या दृष्टीने दुसऱ्या

क्रमांकावर उच्च माध्यमिक शाळा उत्तीर्ण झालेले विद्यार्थी आहेत आणि अधिक औपचारिक संभाषणामध्ये ते प्रतिष्ठित समजल्या जाणाऱ्या उच्चारणाकडे खूप अधिक झुकलेले दिसतात. भाषाबदलाच्या प्रक्रियेच्या आकृतिबंधांचे हे जे महत्त्व आहे त्याचा लबव यांनी विशेष विचार केला आहे. क्लिष्ट स्वरूपाच्या या आकृतिबंधाचे सुलभ रूपांतर करून पाहणे उपयुक्त ठरेल. अमूर्त स्वरूपात ते पुढीलप्रमाणे दिसेल :



शैलीबदलातील फरकाचे या आलेखात दिसणारे स्वरूप तरीही अतिशय गुंतागुंतीचे आहे. सगळ्यात वरच्या वर्गाचे व सगळ्यात खालच्या वर्गाचे भाषक कमीत कमी शैलीबदल दाखवितात. वरून दुसऱ्या क्रमांकाच्या वर्गाचे भाषक सर्वाधिक शैलीबदल दाखवितात, आणि अधले मधले भाषिक समूह त्यांच्या खालोखाल शैलीबदल दाखवितात. हा मुद्दा सूत्ररूपात मांडायचा झाला तर गौरवर्णियांच्या भाषिक समूहात (r)च्या उच्चारणाचा सामान्य नियम पुढीलप्रमाणे मांडता येईल :

**सूत्र ३ :**

[+ मध्य] → ([- व्यंजनिक]) / [- व्यंजनिक]--- – **स्वरित**.[१२]

सूत्र क्र. २ हे त्यामानाने सोपे, सरळ होते. त्यामध्ये आदत्त चलघटक स्थिरांक$_0$ यावर असणारे निर्बंध ज्या प्रकारे दाखविले होते त्याप्रकारे ते सूत्र क्र. ३ मध्ये कसे दाखवायचे हा प्रश्न येथे उद्‌भवतो. शैलीबदलाचे महत्त्व समजून घेतले तरच या प्रश्नाचे उत्तर मिळू शकेल. योग्य शब्दप्रयोगाच्या बाह्य मानकाला मान्यता देण्याने शैलीबदलाचे नियमन होत असते. अशा नियमनाचे सामर्थ्य हे भाषिक असुरक्षिततेच्या भावनेच्या



अनुक्रमणिका

निर्देशांकावरून – इंडेक्स ऑफ लिंगिंग्विस्टिक इन्सिक्युरिटि (आय.एल.आय.) – ठरविता येते. आकृती क्र.२ मधील शैलीबदलाची वक्रता विशद करण्यासाठी तो निर्देशांक आपल्याला उपयुक्त ठरतो. त्यामध्ये कनिष्ठ मध्यमवर्ग सर्वाधिक शैलीबदल दाखवितो, हे आपण पाहिले आहे (लबव, 1966:477). म्हणून मग सूत्र क्र.३ हे पुढीलप्रमाणे लिहिता येईल :

**सूत्र ४ :**

$k_0$ = f (Class Style) = a (SEC) + b (ILI) (Style) + c

स्थिरांक$_0$=संबंध (वर्ग, शैली)=अ(सामाजिक-आर्थिक वर्ग)+ब(आय.एल.आय.)(शैली)+क

**भाषेच्या सामाजिक संरचनेविषयीच्या समस्या :**

भाषेच्या सामाजिक संरचनेचा पाठपुरावा करताना तातडीने सोडविण्याची पहिली समस्या म्हणजे शैलीच्या परिमाणाची संख्यात्मक मांडणी करणे ही आहे. बोलण्याकडे जे अवधान पुरविले जाते त्याचा संख्यात्मक अभ्यास करून त्याचा शैलीबदलाशी संबंध जोडता आला तर आपल्याला सूत्र २ किंवा ४ यांची अधिक अचूक मांडणी करता येईल आणि त्यांतील स्थिरांक १,२,३ हेही निश्चितपणे सांगता येतील. अशी संख्यात्मक मांडणी पुढील प्रकारच्या संशोधनातून मिळविता येईल : डोळ्याच्या बाहुलीच्या प्रसरणाचा अभ्यास, बोलण्याकडे जे अवधान पुरविले जाते त्याची यांत्रिक व मापनयोग्य कसोट्यांच्या द्वारे पद्धतशीर विभागणी, किंवा बोलणारी व्यक्ती स्वत: ऐकून बोलण्याचे जे नियंत्रण करते ते कमी करण्यासाठी आसमंतातील गोंगाटाची पातळी वाढविणे.

या आधी उल्लेखिलेल्या बऱ्याचशा संशोधनांमध्ये स्थानिक बोलींचा प्रत्यक्ष अभ्यास करून मिळविलेली माहिती अपुरी आहे हे उघड आहे. एकेक व्यक्तीच्या बोलण्याच्या अभ्यासावरून प्रातिनिधिक स्वरूपाचे नमुने मिळतात त्यांची आणि दीर्घकाल केलेल्या भाषिक समूहांच्या अभ्यासाची सांगड घालणे, हा संशोधनाच्या कार्यपद्धतीबाबतचा महत्त्वाचा मुद्दा आहे. कोणत्याही निकषांविना एकेक व्यक्ती निवडायची आणि मग ती व्यक्ती ज्या अनेक गटांची सदस्य आहे त्यांचा अभ्यास करायचा, ही भाषिक समूहविषयक अभ्यासाची आदर्श पद्धत होईल. अभ्यासासाठी आवश्यक नमुन्यांच्या संख्येचा विचार करता सर्वसाधारण सामाजिक संशोधनात ती पद्धती वापरणे जवळजवळ अशक्य झाले असते. परंतु भाषेच्या सामाजिक अभ्यासामध्ये निदान सुरुवातीला तरी छोट्या सामाजिक गटांचीच आवश्यकता असते, हे आपण या आधीच सिद्ध केले आहे. तेव्हा ही पद्धती अशक्य कोटीतील नाही.

भाषेतील शब्दांचे वितरण अनियमित आहे असे दाखविणाऱ्या नियमांची व्यवस्था कशी लावायची ही तिसरी समस्या आहे. भाषेत बदल होत असताना शब्दजातींमधील भेद तात्पुरता नष्ट होत असतो असा बराच पुरावा आता उपलब्ध आहे.[१३] याबाबतीत सर्वात कठीण प्रश्न म्हणजे शब्दांचे वितरण परस्परविरोधी शब्दजातींमध्ये झालेले दिसते, याची नोंद आपल्याला घ्यायला हवी. परंतु ही गोष्ट त्या भाषेच्या निजभाषकांच्या आकलनापलीकडची असण्याची शक्यता असते. उदाहरणार्थ, लॅटिन पूर्वप्रत्यय लावून तयार होणारी इंग्लिश भाषेतील केवळ काही क्रियापदे नाम म्हणून वापरताना त्यांतील आघातस्थान बदलते, जसे conv'ict (क्रियापद) : c'onvict (नाम). परंतु अन्य काही ठिकाणी अखेरच्या स्वरावरील आघात कायम राहतो, जसे cons'ent (क्रियापद) : cos'ent (नाम). शब्दांच्या कोणत्याही उपजातीतील शब्दांचे प्रमाण हे उपसर्गाच्या (पूर्वप्रत्ययाच्या) दीर्घत्वाशी संबंधित असते असे दाखविता येईल. परंतु निजभाषकाला अशा नियमितपणाचा काही उपयोग नसतो, कारण बहुतेक शब्दांमध्ये स्वराघात कोठे होणार हे निश्चित असते. दुसरे उदाहरण म्हणजे ऱ्हस्व a लांबविण्यासंबंधीचा नियम न्यूयॉर्कवासीयांच्या बोलण्यात - CV अशा परिसरात [व्यंजन-स्वर या क्रमाच्या लगेच आधी] सहसा लागू होत नाही. मात्र या नियमाला अपवादही बरेच आहेत. यापैकी बहुसंख्य अपवादांच्या बाबतीत मध्यस्थानी येणारे व्यंजन हे सीत्कार स्वन असते का हे शोधण्यात भाषावैज्ञानिकाला रस असतो. परंतु यासारख्या उदाहरणांमध्ये निजभाषकाच्या दृष्टीने मात्र तो शब्द कोणत्या शब्दजातीत मोडतो एवढेच जाणून घेणे पुरेसे असते. शब्दोच्चारणाच्या बाबतीत निजभाषकाला पर्यायच नसेल तर एखाद्या नव्या नियमामुळे कोणत्या मूळ शब्दजातीचे प्रमाण बदलले हे जाणून घेण्यात त्याला काहीच रस नसतो. यामुळे कदाचित असे होईल की निजभाषकाच्या 'ज्ञाना'चा भागच *नसणारे* नियम आपण व्याकरणामध्ये घालू. त्यामुळे आपल्या संशोधनाच्या या टप्प्यावर आल्यानंतर निजभाषकाविषयीच्या या विशिष्ट रूपकाला काहीच महत्त्व उरणार नाही.

चौथे मोठे आव्हान म्हणजे अधिक अमूर्त पातळीवरील वाक्यरचनांशी संबंधित चलघटकांचा अधिक सखोल अभ्यास करणे हे आहे. हे चलघटक म्हणजे स्थानांतरण (extraposition), नामपदबंधामध्ये रचनांतरण (nominalization), विधेयपूरकांची स्थाननिश्चिती (placement of complementizers), नकारार्थी रचनांमध्ये होणारे चलघटकांचे स्थानांतरण (negative raising), प्रश्नार्थक रचनांमध्ये wh ने सुरू होणाऱ्या चलघटकांचे स्थानांतरण (wh-attachment), जो-घटक असणाऱ्या संबंधी रचनांमधील चलघटकांचे स्थानांतरण. या भाषावैशिष्ट्यांचा सामाजिक संदर्भामध्ये अभ्यास करण्यात दोन मुख्य अडथळे येतात. एक म्हणजे, या संदर्भातील चपखल

उदाहरणे अगदी कमी उद्भवतात. दुसरे म्हणजे, त्यांचे अमूर्त पातळीवरील विश्लेषण फार ठामपणे करता येत नाही. विशिष्ट जातीजमाती एकवटलेल्या शहरी वस्त्यांवरील आमच्या अलीकडील संशोधनाने अशा कामाची सुरुवात तर झालेलीच आहे. मात्र अधिकाधिक अमूर्त पातळीवर संशोधन करण्यात येणाऱ्या आव्हानांकडे दुर्लक्ष करता येणार नाही. भाषेचा सामाजिक संदर्भातील अभ्यास जर महत्त्वपूर्ण ठरायचा असेल तर तो केवळ (th)- सारख्या स्वनिमात्मक चलघटकांच्या पातळीपुरता मर्यादित राहून चालणार नाही.

पाचवी समस्या म्हणजे अशा प्रकारच्या संशोधनाची व्याप्ती विशिष्ट भाषिक समूहांपुरती मर्यादित न ठेवता ती त्यापलीकडे वाढवीत अधिक वरच्या पातळीवर नेऊन संपूर्ण इंग्लिश भाषिक समूहाच्या व्याकरणाशी त्याची सांगड घालणे. या दृष्टीने बेली यांचे कार्य महत्त्वाचे आहे. विशेषतः अमेरिकेच्या दक्षिण भागातील बोलीमधील स्वनिमविषयक नियमांचा त्यांनी केलेला सखोल अभ्यास (1969a) आणि संपूर्ण इंग्लिश भाषेचा स्वनिमविचार साकल्याने करून सर्वबोलीसमावेशक अशा नियमांचा एक संच तयार करण्यासाठी त्यांनी केलेले प्रयत्न (1969b). बेली यांचे हे संशोधन भाषेच्या संदर्भनिष्ठ अभ्यासावर आधारलेले नसले तरीही अशा सर्वसामान्य स्वरूपाच्या आणि अमूर्त पातळीवरील संशोधनाला पूरक अशी विश्वासार्ह सामग्री कधीतरी उपलब्ध होईल अशी आशा करता येईल.

**प्रमाणके आणि भाषिक वर्तन यांमधील संबंध :**

आतापर्यंत आपण भाषेच्या सामाजिक संरचनेचा जो विचार केला त्यात लोक काय बोलतात ते पाहिले आणि काय *बोलायला हवे* असे ते समजतात हे केवळ अनुषंगाने पाहिले. हा भाषेला मिळणारा ''द्वितीय पातळीवरील प्रतिसाद'' होय. लोकप्रिय मिथकाचा एक भाग म्हणून आपण त्याच्याकडे पाहायला हवे असे ब्लूमफिल्ड (1944) यांनी सुचविले आहे. भाषेविषयी बोलण्यासाठी बहुतेक लोकांजवळ फारच तोकडी शब्दसंपत्ती उपलब्ध असते आणि पुन्हा पुन्हा त्याच संज्ञा ते वापरतात: उदा. अमुक लोकांचे बोलणे ''फार नाकातून येते'', ''कंटाळवाण्या चढ-उतारांचे असते'', ''फार कठोर वा घशातून गुरगुरल्यासारखे असते,'' किंवा ''निष्काळजीपणाचे असते'' अशी शेरेबाजी अनेकदा ऐकायला मिळते. त्याचप्रमाणे त्यांचे व्याकरण ''गोंधळाचे'' वा ''तर्कशून्य'' असते, असेही ऐकायला मिळते.

भाषेचे काही थोडे सामाजिक निर्देशक हे प्रकट सामाजिक जाणिवेच्या स्तरावर पोहोचतात आणि त्यांची साचेबंद चिन्हे होऊन जातात. अशा प्रकारच्या साचेबंद चिन्हांमध्ये व त्यांच्या प्रत्यक्ष भाषिक प्रयोगांमध्ये निश्चित संबंध असेलच असे नाही.

अमेरिकेमध्ये (ing) आणि (dh) हे अशा प्रकारचे साचेबंद ठोकताळे झाले आहेत: अमुक व्यक्ती बोलताना ''(g) खाऊन टाकते'', किंवा ''dese, dem, dose, असे बोलणाऱ्यांतली ही व्यक्ती आहे'' या प्रकारची विधाने केली जातात. बहुतेक भाषिक समूहांत असे काही स्थानिक ठोकताळे असतात. उदा. न्यूयॉर्कमध्ये ''ब्रुकलिनीज'' म्हटले की त्याचा रोख thirty thirdच्या ऐवजी "thoity-thoid" असे म्हणणाऱ्यांकडे असतो, तर बॉस्टनमध्ये "cah" आणि "pahk" या शब्दांतील विवृत अग्रस्वर [a] हा फार लक्ष वेधून घेतो. तसेच उत्तर कॅरलायना या राज्यातील मुख्य भूमीपासून वेगळे पडलेल्या केप हॅटरस येथील बोली बोलणाऱ्यांना "hoi-toiders" म्हणून ओळखतात, कारण ते high, tide, इ. शब्दांतील स्वराचे उच्चारण पश्च स्थानी आणि ओठ गोलाकार ठेवून करतात. [भा८]

फार काही नाही तरी असे साचेबंद सामाजिक ठोकताळे भाषेच्या संरचनेचे अपुरे आणि विस्कळित स्वरूपाचे चित्र उभे करतात एवढे निश्चितपणे म्हणता येते. सामान्यत: एवढे ठामपणे म्हणता येईल की बोलण्यातील सामाजिक स्तरावर उघडपणे दिसणारी सुधारणा ही अत्यंत अनियमित स्वरूपाची असते, आणि अगदी वारंवार वापरात येणाऱ्या शब्दसाठ्यावरच तिचा सगळा भर असतो. याउलट, या चलघटकांची विशिष्ट (मार्क्ड) रूपे ज्यामधून निर्माण होतात त्या भाषिक उत्क्रांतीची प्रक्रिया मात्र अतिशय नियमित स्वरूपाची असते. ज्यामध्ये बोलण्याकडे किमान अवधान पुरविलेले असते अशा स्थानिक बोलींवरून भाषेच्या संरचनेचे नियमित चित्र आपल्याला पाहायला मिळते याचे मूळ कारण हेच आहे. उदाहरणार्थ, न्यूयॉर्क शहरातील स्थानिक बोलीचा विकास होताना त्यातील off, lost, shore, more इ. शब्दांमधील स्वराचे उच्चारण होताना तो स्वर [मुखविवरात] वर उचलला जाऊन अधिकाधिक संवृत झाला आणि अखेर sure, moor यांसारख्या शब्दांमध्ये आढळणाऱ्या स्वरात तो विलीन होऊन गेला. हा संवृत स्वर अशिष्ट मानला जातो आणि अलीकडे मध्यम वर्गातील भाषक अनियमितपणे त्याची दुरुस्ती करतात. परंतु त्याचवेळी boy, toy इ. शब्दांमध्ये तोच स्वर संवृत होतो तेव्हा त्यात कधीही दुरुस्ती केली जात नाही.[१४]

मात्र बोलण्याविषयीच्या व्यक्तिनिष्ठ प्रतिक्रिया या सामाजिक जाणिवेच्या पातळीवर आलेल्या काही थोड्या साचेबंद ठोकताळ्यांपुरत्या मर्यादित नसतात. भाषेविषयीच्या अबोधपणे केलेल्या सामाजिक मूल्यविधानांचे मापन लँबर्ट यांच्या "matched guise" [भा८] या चाचणीने आणि वर वर्णन केलेल्या इतरही चाचण्यांनी करता येते. एक मूलभूत तत्त्व त्यातून निष्पन्न होते, आणि ते म्हणजे *संपूर्ण भाषिक समूहामध्ये भाषेकडे पाहण्याचे सामाजिक दृष्टिकोण हे अगदी एकसारखेच असतात.*[१५] उदाहरणार्थ,

आकृती ३ (अ) :




आकृती क्र. ३ (अ) : सहजपणे बोलताना चार वेगवेगळ्या वयाच्या व्यक्तींमध्ये ear, board, car इ. शब्दांमधील (r)च्या उच्चारणावरून दिसणारे वर्गनिहाय स्तरीकरण : न्यूयॉर्क शहर (लबव, 1966:344).

आकृती ३ (आ) :




आकृती क्र. ३ (आ) : वयानुसार घेतलेल्या व्यक्तिनिष्ठ प्रतिक्रिया चाचण्यांवरून (r) चा उच्चार होतो असे दाखविणारी टक्केवारी (दोन विकल्प असणाऱ्या चाचण्या) : न्यूयॉर्क शहर (लबव, 1966:435)

लॅंबर्ट यांच्या अभ्यासावरून असे दिसते की कनेडिअन फ्रेंचविषयी नकारात्मक दृष्टिकोण हा केवळ इंग्लिश भाषिक समूहातच प्रचलित आहे असे नव्हे तर क्विबेकमधील फ्रेंच भाषकांमध्येही तो जवळ जवळ तेवढ्याच प्रमाणात प्रचलित आहे (लॅंबर्ट, 1967).

(r) सारख्या निर्देशकाच्या उपयोगाबाबत वर म्हटल्याप्रमाणे खूपच भिन्नता असूनही त्या निर्देशकाविषयीच्या लोकांच्या व्यक्तिनिष्ठ अबोध प्रतिक्रियांचा आम्ही अभ्यास केला असता तेव्हा त्यात अत्यंत आश्चर्यकारक एकवाक्यता आढळली. भाषेच्या सामाजिक संरचनेविषयी एक सामान्य तत्त्व पुढीलप्रमाणे मांडता येईल : *भाषिक वर्तनामध्ये भाषेच्या सामाजिक चलघटकाचे जे नियमित स्तरीकरण आणि त्या चलघटकाविषयीच्या व्यक्तिनिष्ठ प्रतिक्रियांमधील नियमित एकवाक्यता, या दोहोंमध्ये परस्परसंबंध दिसून येतो.* न्यूयॉर्क शहरातील लोकांचे (r) बाबतचे वर्तन आणि त्यांच्या (r) बाबतच्या व्यक्तिनिष्ठ प्रतिक्रिया यांची तुलना आकृती क्र. ३ मध्ये केली आहे, त्यावरून हा मुद्दा सोदाहरण दाखविता येतो. तरुणांच्या स्थानिक बोलीमधील (r) च्या उच्चाराच्या संदर्भात होणारे सामाजिक स्तरीकरण आकृती ३ अ मध्ये दाखविले आहे. सामाजिक दर्जा व (r) चा प्रयोग यांमध्ये काही विशेष स्वरूपाचा संबंध आहे असे ४० वर्षांवरील लोकांच्या बाबतीत दिसत नाही. परंतु ४० वर्षांखालील लोकांच्या बाबतीत उच्च मध्यम वर्ग आणि इतर गट यांच्यामध्ये लक्षणीय स्वरूपाचा फरक आढळतो. आकृती ३ आ मध्ये मूल्यनिकषाधिष्ठित परस्परसंबंध दाखविला आहे. ४० वर्षांवरील लोकांच्या (r) चा प्रयोगाबाबतच्या व्यक्तिनिष्ठ प्रतिक्रिया जवळ जवळ पूर्णपणे अनियमित आहेत. याउलट १८ ते ३९ या वयोगटातील लोकांच्या प्रतिक्रियांमध्ये संपूर्ण एकवाक्यता आहे : ४२ पैकी सर्व ४२ व्यक्तींना (r) चा उच्चार करणे अधिक शिष्टसंमत वाटते, असे त्यांच्या प्रतिक्रियांमधून अबोधपणे व्यक्त झाले.

आकृती १ व २ मध्ये दिसणाऱ्या आकृतिबंधांचे पुनर्निरीक्षण केले असता शैलीबदलाचे स्थिर प्रमाण हे सुद्धा भाषिक समूहाच्या एकमुखी दृष्टिकोनाचे प्रतिबिंब आहे हे सहजपणे दिसून येते. परंतु मग हा आकृतिबंध इतका दीर्घकाळ कशामुळे टिकून राहतो असा प्रश्न (th) सारख्या भाषेच्या स्थिर सामाजिक निर्देशकाच्या बाबतीत निर्माण होईल. आपण अमुक एक प्रकारे बोलले पाहिजे असे लोकांना खात्रीलायकपणे वाटत असेल तर मग तशा प्रकारे सगळेच लोक का बोलत नाहीत ? आळशीपणा, निष्काळजीपणा किंवा शिष्टसंमत रूपांपासून दूरत्व, अशी त्याची कारणे सामान्यत: सांगितली जातात. परंतु स्थानिक बोलीमधील शब्दरूपे शिष्टसंमत नसली तरी उच्चारण्यास सोपी असतात अशा समजाला काही आधार नाही.[१६] मोठ्या शहरांमध्ये बोलताना लोक व्यवस्थित काळजी घेतात, या गोष्टीला मात्र ठोस पुरावा आहे. या अवघड समस्येचा काळजीपूर्वक विचार केल्यानंतर वरील दृष्टिकोणाच्या पूर्ण विरोधी असे एक गृहीतक आम्ही मांडतो : येथील भाषिक व्यवहारात असणारी छुपी प्रमाणके ही स्थानिक बोलीला सकारात्मक मूल्य देणारी असतात. शहरी भागात प्रत्यक्ष मुलाखत





अनुक्रमणिका

किंवा मनोभाषावैज्ञानिक चाचणी यांसारख्या औपचारिक संदर्भांमध्ये मिळणाऱ्या प्रतिसादामधून ही प्रमाणके शोधून काढणे हे अत्यंत कठीण काम आहे. अशा संदर्भामध्ये मध्यमवर्गीय मूल्ये इतकी वरचढ असतात की त्याच्या विरोधी काही मूल्ये असतील अशी जाणीवही बहुसंख्य माहितीदारांना होत नाही, मग अन्य संदर्भांमध्ये त्यांच्या वर्तनावर त्या विरोधी मूल्यांचा भलेही प्रभाव असो. नीग्रो समाजावरील आमच्या अलीकडील संशोधनात आम्हाला अशा विरोधी प्रमाणकांच्या अस्तित्वाचा पुरावा सापडला आहे. (परीक्षणार्थ घेतलेले कोणतेही चलघटक ज्यांत अंतर्भूत नाहीत अशी) काही ''शून्य'' वाक्ये कामगार वर्गातील आणि मध्यम वर्गातील भाषकांना देऊन त्यांच्या व्यक्तिनिष्ठ प्रतिक्रियांची चाचणी घेतली व त्यांची तुलना केली. त्यातील पहिल्या दोन घटकांबाबतची त्यांची प्रतिक्रिया आकृती ४ मध्ये दाखविली आहे.

आकृती ४ :




आकृती क्र.४ : पाच सामाजिक गटांमध्ये तीन भिन्न पातळ्यांवर घेतलेल्या चाचण्यांवरून असे दिसते की मध्यमवर्गीय भाषकाला निम्नवर्गीय भाषकापेक्षा अधिक टक्के गुण मिळतात (लबव आणि इतर, 1968:242).

''नोकरी'' ही मोजपट्टी लावल्यास मध्यमवर्गीय भाषक हा अधिक लायक आहे, असे मूल्यमापन करणाऱ्यांची टक्केवारी या आलेखातील वरची रेषा दर्शविते. मध्यमवर्गीय माहितीदारांच्या बाबतीत ही टक्केवारी फार जास्त आहे, आणि जसजसे आपण निम्न सामाजिक-आर्थिक स्तरावरील समूहांकडे सरकतो तसतशी ती थोडी कमी झालेली दिसते. खालची रेषा याच्या उलट प्रकार दर्शविते. ''अमूक तऱ्हेने बोलणारा माणूस जर रस्त्यावरील एखाद्या मारामारीत सापडला असेल तर तो जिंकण्याची शक्यता कितपत आहे ?'' अशासारख्या ''मारामारी'' किंवा ''टगेगिरी''

या विषयीची मोजपट्टी लावून लोकांची त्यावरील प्रतिक्रिया खालच्या रेषेवर नोंदविली आहे. पहिल्या रेषेच्या अगदी विरुद्ध जाणारी अशी ही रेषा आहे. शाळेतील शिक्षकांनी ज्याचे दृढीकरण केले आहे असा हा साचेबंद ठोकताळा असेलही, परंतु समाजातील सत्यस्थितीची जाणीवही त्यातून व्यक्त होते. ''मैत्री'' विषयीची मोजपट्टी लावून त्यावरील प्रतिक्रियांचा तिसरा संच दर्शविणारी रेषा मात्र अधिक अर्थगर्भ आहे. ''अशा प्रकारे बोलणाऱ्या या माणसाला तुम्ही जर बराच काळ ओळखत असाल तर तो तुमचा चांगला मित्र होण्याची कितपत शक्यता आहे?'' या प्रश्नाला मिळालेल्या उत्तरांचे हे मोजमाप आहे. वरच्या तीन आर्थिक-सामाजिक स्तरांमधील भाषकांच्या बाबतीत ही रेषा नोकरीविषयक प्रतिक्रिया दर्शविणाऱ्या रेषेला बरीचशी समांतर आहे. मात्र निम्न स्तरावरील कष्टकरी वर्गाच्या बाबतीत ही रेषा अचानक दिशा बदलते आणि मारामारीविषयक प्रतिक्रिया दर्शविणाऱ्या रेषेला समांतर होऊ लागते. ज्यांची तपासणी आपण करीत आहोत अशा सर्वच चलघटकांच्या बाबतीत हा प्रकार आढळून येतो (लबव व इतर 1968, 3.6).

तेव्हा (th) आणि (ing) यांसारख्या भाषेच्या स्थिर सामाजिक निर्देशाकांमध्ये नियमित स्वरूपाचा परस्परसंबंध असतो, आणि हा संबंध दोन मूल्यकल्पनांच्या संचांमधील विरोधाच्या स्वरूपात मांडण्यासाठी काही पुरावा आपल्यापाशी आहे. होमन्झ (1955) यांच्या मते या प्रकारच्या संशोधनाचे खरे उद्दिष्ट केवळ वर्तनाचा किंवा नियमांचाच अभ्यास करणे हे नसून कोणत्या मर्यादेपर्यंत (आणि कोणत्या नियमांनुसार) लोक त्यांच्या मनातील सुनिश्चित निकषांपासून दूर जातात हे पाहण्याचे आहे, आणि आम्ही त्यांच्या मताशी सहमत आहोत. अमूर्ततेच्या या स्तरावर भाषेविषयीचे आणि तिच्या सामाजिक स्वरूपाविषयीचे सिद्धांत आपल्याला उत्तम प्रकारे विकसित करता येतील.

## भाषिक उत्क्रांतीमध्ये सामाजिक घटकांचे स्थान

या निबंधातील विवेचन मुख्यत: भाषिक परिवर्तनाच्या प्रश्नांविषयी नाही, हे खरे असले तरी या प्रश्नांशी संबंधित असणारी काही सामग्री मी आधीच नोंदवून ठेवली आहे. भाषिक उत्क्रांतीवर सामाजिक घटकांचा किती प्रभाव असतो याचा विचार करताना सामाजिक मूल्ये आणि भाषिक संरचना यांच्यामध्ये किती संपर्क आला आहे वा त्यांचा किती भाग समान आहे, या बाबीला अवास्तव महत्त्व न देणे, हे महत्त्वाचे आहे. भाषिक व सामाजिक संरचना यांमध्ये पूर्ण परस्परव्याप्ती कधीच नसते. भाषिक नियमांपैकी बहुतेक नियमांना फारसे सामाजिक मूल्य नसते. बोलणाऱ्या व्यक्तीपाशी

अर्थांचा वा हेतूंचा जो गुंतागुंतीचा संच असतो त्याला सरल-रेषात्मक रूपात व्यक्त करण्यासाठी एक यंत्रणा आवश्यक असते आणि ही यंत्रणा भाषिक नियमांकडून पुरवली जाते. उदाहरणार्थ, समनिर्देश करणारी सर्वनामे स्थानांतरित होणे या संबंधीच्या नियमांची चर्चा आपण वर केलेली आहे. या नियमांचा सामाजिक परिणाम होण्याची काहीच शक्यता नसते. या नियमांचे सामाजिक वितरण अनियमित व विस्कळित असते हेच यावरून दिसते.

पृष्ठस्तरीय संरचनेमधील काही चलघटक हे अनेकदा सामाजिक परिणामांच्या दृष्टीने महत्त्वाचे ठरतात. वास्तविक पाहता, ज्यावेळी भाषिक भेद [म्हणजे नियमांपेक्षा वेगळे असे भाषिक वापराचे प्रकार] निर्माण होतात त्यावेळीच त्यांना काही सामाजिक मूल्य प्राप्त होते. दोन वेगवेगळ्या भाषिक प्रयोगांचा ''अर्थ एकच होतो'' हे मानायला बोलणाऱ्यांची खरे पाहता तयारी नसते, आणि या वेगळ्या भाषिक प्रयोगांना ते वेगळे अर्थ देऊ पाहतात.[१७] बोलणाऱ्यांचा एखादा गट एखादा विशिष्ट भाषिक भेद वापरत असेल तर त्या गटाला जे सामाजिक मूल्य प्राप्त झालेले असते तेच त्या भेदालाही चिकटविले जाते. स्टर्टव्हँट (1947) यांनी भाषिक परिवर्तनाचे जे सर्वसामान्य प्रतिरूप मांडले आहे त्यात असे सुचविले आहे की दोन भाषिक रूपे जेव्हा वेगळी असतात तेव्हा ती विशिष्ट सामाजिक गटांनी स्वत:ची म्हणून निवडल्यामुळे वेगळी असतात. या प्रश्नाची तड लागून त्यांतले एक रूप स्थिर होते व संपूर्ण भाषेत स्वीकारले जाते तेव्हा त्याला चिकटलेले सामाजिक मूल्य नाहीसे होते.

सामाजिक अर्थ हा पूर्णपणे भाषेवर [म्हणजे भषिक व्यवस्थेवर] अवलंबून असतो असे म्हणता येईल. विशिष्ट अर्थ व्यक्त करण्यासाठी सर्वत्र सातत्याने लागू पडणारे भाषिक नियम असतील तर भाषा हे एक तटस्थ साधन असते असे मानता येईल. परंतु भाषेत परिवर्तन होताना अपरिहार्यपणे काही नियम चल स्वरूपाचे असतात आणि भाषेतील ही चलक्षेत्रे एखाद्या लाटेसारखी भाषिक व्यवस्थेत पसरत जातात. विशिष्ट भाषिक परिवर्तन जेव्हा घडते तेव्हा सामान्यत: ते प्रथम एखाद्या सामाजिक गटाच्या अंतर्गत घडते आणि नंतर पुढील पिढ्यांमधून नवनवीन रूपे अधिकाधिक व्यापक सामाजिक क्षेत्रांत इतर गटांपर्यंत पसरत जातात. न्यूयॉर्क शहरामध्ये ऱ्हस्व [a] या स्वराच्या संवृतीकरणाची सुरुवात श्रमजीवी इटालिअन वर्गातील स्त्रियांच्या बोलण्यामध्ये झालेली आढळते, तर off, lost यांसारख्या शब्दांमधील संवृत [o] या स्वराचे विवृतीकरण निम्न मध्यमवर्गातील ज्यू स्त्रियांमध्ये खूपच दृढ झालेले दिसते (लबव, 1966). डेट्रॉइट शहरात ऱ्हस्व [a] या स्वराच्या विवृतीकरणाविषयी फासोल्ड यांनी केलेल्या निरीक्षणावरूनही असे दिसते की निम्न-मध्यम वर्गीय स्त्रियांच्या बोलण्यात

या प्रक्रियेची सुरुवात होते. जे भाषिक निर्देशक (इंटिकेटर्झ) शैलीतील बदल न दर्शविता फक्त सामाजिक वितरण दर्शवितात [म्हणजे हे घटक वेगवेगळ्या सामाजिक गटांत वेगवेगळे होत जातात] ते या परिवर्तनाच्या प्रक्रियेचा प्रारंभ करून देतात. या उलट भाषेतील जी *व्यवच्छेदक चिन्हे* (मार्कर्झ) शैलीतील व समाजातील स्तरीकरण दर्शवितात ती बदलाच्या प्रक्रियेला मिळणारा सामाजिक प्रतिसाद कसा विकसित होतो हे दर्शवितात, आणि या चलघटकांना सामाजिक मूल्य कसे प्राप्त होते हेही स्पष्ट करतात. जे साचेबद्ध घटक सामाजिक दृष्ट्या पूर्णपणे सबोध पातळीवर आलेले असतात ते घटक एक तर आधीच सुरू झालेल्या आणि पूर्णत्वाला गेलेल्या बदलांवर आधारित असतात, किंवा अंत:स्तरावर असणाऱ्या सामाजिक मूल्यघटकांमधील विरोध व्यक्त करतात.

सामाजिक भाषिक चलघटकांपैकी बरेचसे चलघटक हे व्यामिश्र अशा भाषिक संबंधव्यवस्थेचे घटक असतात. या चलघटकांच्या द्वारे भाषिक परिवर्तन व्यवस्थेत जसजसे पसरत जाते (लबव, 1965), तसतसा सामाजिक मूल्यातही हळूहळू बदल होत जातो. सर्वसाधारणपणे बोलायचे तर या व्यवस्थेच्या एका भागात (उदा० अग्र स्वर) परिवर्तन घडून ते इतर समांतर घटकांमध्ये (उदा. पश्च स्वर) पसरण्यासाठी सुमारे तीस वर्षे लागतात असे दिसते. परंतु सामाजिक संरचना मात्र इतक्या प्रदीर्घ काळपर्यंत क्वचितच स्थिर राहतात. उदाहरणार्थ, मार्थाझ् विनयार्ड [भा१०] या अमेरिकेच्या भागात राहणाऱ्या कोळ्यांचा भाषेत nice, right, side यांसारख्या शब्दांमध्ये जोडस्वराचे केंद्र हळूहळू वर उचलेले गेलेले [म्हणजे उच्चारतेवेळी मुखविवर अधिक विवृत झालेले] दिसते (लबव, 1963). हे स्वनपरिवर्तन अधिक व्यापक होऊन out, proud यांसारख्या शब्दांमधील जोडस्वरांमध्येही समांतरपणे घडून आले. परंतु दरम्यानच्या काळात पोर्तुगीज-अमेरिकनांच्या दुसऱ्या व तिसऱ्या पिढ्यासुद्धा या भाषिक समूहात सामील झाल्या आणि विविध कारणांमुळे त्यांनी या जोडस्वरांमधील दुसरा स्वर अधिक संवृत करण्यावर भर दिला. त्यामुळे ही संपूर्ण प्रक्रियाच एका अधिक व्यापक पातळीवर गेली असे दिसते. अशा प्रकारे एखाद्या घटकाच्या भाषिक परिवर्तनाची प्रक्रिया एकदा सुरू झाली की पुढील अनेक पिढ्या बदलत्या सामाजिक संरचनेच्या संदर्भात या प्रक्रियेचा नवा अर्थ लावू पाहतात. भाषेच्या अंतर्गत संरचनात्मक सामान्यीकरणाची प्रक्रिया आणि सामाजिक व्यवस्था व भाषा यांमधील परस्परक्रिया या दोहोंमध्ये आंदोलन होत राहते, आणि या आंदोलनामुळेच भाषिक उत्क्रांतीमध्ये सातत्य राहते (लबव, 1965).

भाषिक संरचनेच्या एककालिक पैलूच्या संदर्भात सामाजिक घटकांना फार महत्त्व

देणे चुकीचे ठरेल. चॉम्स्कीप्रणीत निर्देशनात्मक व्याकरण भाषेच्या सामाजिक संदर्भाकडे संपूर्णतः दुर्लक्ष करीत असले तरीही या व्याकरणाने भाषेच्या अंतर्गत संरचनेमधील अचल संबंधांचा वेध घेण्याबाबतीत खूप प्रगती केली आहे. परंतु, भाषिक उत्क्रांतीला सामाजिक घटकांमुळे चालना मिळते, आणि या घटकांचा गंभीरपणे अभ्यास केल्याविना भाषिक परिवर्तनाची यंत्रणा समजून घेण्यात फारशी प्रगती करता येणार नाही, हे आता स्पष्ट झालेले आहे.

**टिपा :**

(८) भाषेच्या समाजलक्ष्यी संशोधनातील हा एक वेधक निष्कर्ष आहे. त्याचे कारण असे की भाषेच्या समाजातील ठरीव स्वरूपाच्या उपयोगाविषयी निव्वळ 'सामान्य ज्ञाना'च्या आधारे लिहिल्या गेलेल्या निबंधांमधून भाषेचे 'कार्यलक्ष्यी प्रकार' व 'सांस्कृतिक स्तर' यांना पूर्णतः स्वतंत्र परिमाणे आहेत असे दाखविले गेले आहे. परंतु ती दोन्ही परस्परांवर अवलंबून असतात, हे प्रस्तुत अभ्यासावरून आणि आजवर झालेल्या इतर अनुभवनिष्ठ संशोधनावरून सिद्ध होते. एकच चलघटक दोन्ही परिमाणांमध्ये कार्य करतो असे म्हणणे गैरसोयीचे वाटते खरे, परंतु बोलण्याकडे अवधान पुरविणे व निकषांची संवेदनात्मक जाणीव होणे, यांचा अंतर्भाव असणाऱ्या भाषेच्या ज्या समाजलक्ष्यी प्रक्रिया आहेत त्यांचा हा अटळ परिणाम आहे. या प्रक्रियांची रूपरेषा पुढे मांडली आहे.

(९) चॉम्स्की व हॅले (1968) यांनी वापरलेल्या चिन्हव्यवस्थेपेक्षा येथे वापरलेली चिन्हव्यवस्था थोडीशी वेगळी आहे : उजव्या बाजूच्या पदाभोवती असणारा कंस तो बदलविषयक नियम आहे असे दर्शवितो. कंसचिन्हाच्या या संकेतामुळे पुढे सूत्र २मध्ये विकसित केलेल्या $\varphi = 1 - k_0$ या नियमाचा अर्थ आपोआप लागतो. हा नियम पुढील स्वरूपात मांडता येईल : ''व्यंजने जर ऊष्म (स्ट्रायडंट) नसतील आणि जिव्हाग्राने उच्चारलेली (कॉरोनल) नसतील तर त्यांचे प्रवाही (कंटिन्युअंट) किंवा घर्षक (फ्रिकेटिव्ह) हे स्वरूप विकल्पाने नष्ट होते.'' अशा प्रकारे मांडलेला नियम हा (th)सारखीच संरचना असणारे त्याचे सघोष रूप (dh) याला व तोही सर्व स्वनात्मक परिसरांमध्ये लागू होतो. (th) आणि (dh) यांमधील फरक प्रस्तुत स्वनपरिसरामध्ये दाखविल्याप्रमाणे (- $\alpha$ प्रताणयुक्त [म्हणजे टेन्स] अशा प्रकारे) किंवा आधीच्या वा नंतरच्या पदाला जोडलेले चलघटक अशा प्रकारे दाखविण्याचे काम चलघटकविषयक निर्बंध करतात असे दिसते. येथे आपली चर्चा ही चलघटक-विषयक आदानसामग्री

स्थिरांक$_0$ ($k_0$) यापुरती मर्यादित आहे. म्हणून येथे इतर तपशीलाचा उल्लेख केलेला नाही.

(१०) शब्दाच्या आद्यस्थानी येणारा (dh) हा चलघटक नीग्रो भाषिक समूहात (th) पेक्षा अधिक नियमितपणे आढळतो. शब्दाच्या अंत्यस्थानी येणारा(th) हा ध्वनी(t) नव्हे तर बऱ्याचदा (f) असा उच्चारला जातो. मात्र शब्दाच्या आद्यस्थानी आल्यास कॉकनी[भा११] या बोलीप्रमाणे त्याचा (f) असा उच्चार होत नाही. (th) आणि (dh) ही अंगभूत स्वरूपाच्या बदलाची उदाहरणे आहेत हे ध्यानात ठेवले पाहिजे. काही ठिकाणी त्यांचे स्वनात्मक रूप /t/ आणि /d/ यांच्याशी समकक्ष असले तरीही उच्चारणामध्ये अवाजवी सुधारणा येथे होत नाही, हे विशेष आहे. (th) या चलघटकाच्या सविस्तर विश्लेषणासाठी पाहा वोल्फ्रॅम, 1969: 100 व पुढे.

(११) her, heard, यांसारख्या शब्दांत मध्य अर्ध-संवृत स्वरानंतर येणाऱ्या (r) चा समावेश या चलघटकामध्ये केलेला नाही; कारण त्याच्या बदलाच्या प्रक्रियेत एक वेगळा आकृतिबंध दिसतो: त्याचे उच्चारण एक तर तालव्य आणि मुखविवराच्या वरच्या बाजूकडे जाणारा जोड-स्वर असे होते किंवा तो उच्चार अधिक संवृत होतो.

(१२) या औपचारिक सूत्राचा अर्थ पुढीलप्रमाणे : स्वर किंवा जोडस्वर यांच्या नंतर मध्यस्थानीय व्यंजन (r)येत असेल आणि त्यानंतर लगेचच स्वर नसेल तर त्या (r) च्या व्यंजनस्वरूपाचा विकल्पाने लोप होतो. त्या (r) नंतर जर लगेचच शब्द संपत असेल आणि त्यानंतर स्वर येत असेल तर वरील सूत्र लागू होत नाही. म्हणून four o'clock या सारख्या शब्दप्रयोगामध्ये (r) चा उच्चार हा अधिक प्रकर्षाने होतो.

(१३) आकृती १ व २ वरून असे दिसते की सामाजिक-आर्थिक वर्गानुसार संपूर्ण शब्दामध्ये बदल होतो; मात्र शब्दांच्या पातळीवरील बदल अनियमित असतो असे दर्शविणारे काही भाषिक नियमही आढळले आहेत. bad, ask यांसारख्या शब्दांमध्ये ऱ्हस्व /a/ चा उच्चार लांबविण्याबाबत अशी अनियमितता न्यूयॉर्क शहरामध्ये संशोधन करताना पॉल कोहेन यांना दिसून आली आहे. परंतु स्वर अशा तऱ्हेने लांबविल्यानंतर तो अधिक संवृत होतो या बाबत अशी अनियमितता दिसली नाही (लबव, 1955: 51-52). भाषिक बदल पूर्ण झाल्यानंतर शब्दगटांची नव्याने रचना ज्यांच्यामुळे होऊ शकते असे काही बदलविषयक नियम आहेत,

कारण नित्य क्ष किंवा नित्य य अशा तऱ्हेने या शब्दगटांची व्याख्या करता येत नाही; ते कधी क्ष तर कधी य असे बदलत राहतात. अशा शब्दपातळीवरील बदलांच्या संरचनात्मक कारणाच्या चर्चेसाठी पाहा : वँग, 1969.

(१४) my आणि mouth या शब्दांमधील स्वरांवर bad, bar, lost इ० शब्दांमधील दीर्घ व (मुखविवरात) मध्याकडे वळणाऱ्या स्वरांचा परिणाम होतो असेही आपल्याला दिसते. Barमधील स्वर जसजसा (मुखविवरात) मागे सरकतो तसतसा my मधील स्वर त्याच्या बरोबर जातो, आणि mouth मधील स्वर विरुद्ध दिशेने [म्हणजे मुखविवराच्या अग्रभागी] सरकतो. मात्र परस्परांशी नियमितपणे संलग्न असणाऱ्या सर्व बदलांपैकी केवळ bad आणि lost या शब्दांमधील स्वरांचे वर उचलले जाणे [म्हणजे संवृत होणे] हेच शैलीबदल आणि दुरुस्ती दर्शविते. आणि या बाबतींतही दुरुस्ती ही शब्दांच्या घडणीच्या दृष्टीने अनियमित स्वरूपाची असते.

(१५) भाषेकडे पाहण्याचे ज्यांचे दृष्टिकोण समान आहेत अशा व्यक्तींचा समूह म्हणून भाषिक समूहाची व्याख्या करणेही वास्तविक सयुक्तिक आहे. lost या शब्दामधील स्वर यासारख्या चलघटकाचा विचार केला तर स्थानिक न्यूयॉर्कवासीयांच्या व्यक्तिनिष्ठ प्रतिक्रियांमध्ये जो नियमित आकृतिबंध सापडतो तसा कोणताही नियमित आकृतिबंध ज्यांची जडणघडणीची वर्षे न्यूयॉर्क शहराबाहेर गेलेली आहेत अशा लोकांमध्ये आढळत नाही. (लबव, 1966: 651).

(१६) न्यूयॉर्क, डेट्रॉइट किंवा शिकागो या शहरांमधील स्थानिक बोलींमधील काही स्वरांमध्ये होणारे आत्यंतिक स्वरूपाचे बदल म्हणजे खूप लांबविलेले स्वरांचे उच्चार आणि तसे करण्यासाठी प्रमाणित उच्चारांच्या मानाने स्नायूंना घ्यावी लागणारी खूप अधिक मेहनत, हे होत. स्पेक्ट्रोग्राफ या यंत्राच्या साहाय्याने केलेल्या विश्लेषणावरून असे दिसते की ऱ्हस्व /a/ या सारखे स्वर जेव्हा here मधील स्वरोच्चाराइतके [मुखविवरात] वर उचलले जातात [म्हणजे संवृत होतात] तेव्हा ते स्वर पूर्णपणे टोकाचे अग्रस्वर होतात. शिष्टसंमत नसणारी रूपे जे लोक सर्वाधिक प्रमाणात वापरतात तेच लोक इतरांच्या बोलण्यातील तशा रूपांना अशिष्ट मानण्यात सर्वांच्या पुढे असतात. व्यक्तिनिष्ठ प्रतिक्रियांच्या चाचण्यांतून आढळणारा हा आकृतिबंध आणि वर उल्लेखिलेले आत्यंतिक स्वरूपाचे उच्चारबदल यांच्यामध्ये लक्षणीय असा परस्परसंबंध दिसतो.





अनुक्रमणिका

(१७) न्यूयॉर्क शहरामधील बोलीत cruller (डच भाषेत kroeller) या शब्दाऐवजी प्रमाण बोलीतील doughnut या शब्दाचा प्रयोग केला असता लोकांनी त्याचा संबंध वेगवेगळ्या प्रकारच्या पेस्ट्रीशी जोडला. त्याचप्रमाणे स्थानिक बोलीमध्ये pot cheese (डच भाषेत kroller pot kees) या शब्दाऐवजी cottage cheese असा शब्द लोकांनी वापरला आणि त्याचा संबंध चीजच्या अधिक कोरड्या प्रकाराशी जोडून त्याचे वेगळेपण दर्शविले. तसेच vases या शब्दाच्या उच्चारणातील आंदोलने सामाजिक घटकांशी निगडित असावीत या कल्पनेने एका माहितीदाराने असे म्हटले की 'या लहान फुलदाण्यांना मी [व्हेझिझ] म्हणतो, तर मोठ्या फुलदाण्यांना मी [व्हाझिझ] म्हणतो.'

**भाषांतरकारांच्या टिपा**

भा६. अघोष दंतमूलीय घर्षक ध्वनी (इंग्लिशमधील th) हा उच्चार भारतीय भाषांमध्ये नाही. त्यांच्या जवळ येणारा आपल्या परिचयाचा उच्चार (थ) म्हणजे अघोष दंत्य स्फोटक असा आहे.

भा७. पोर्टो रिको हे मध्य अमेरिकेमधील एक बेट असून अमेरिकेची वसाहत आहे. तेथे भाषिकदृष्ट्या स्पॅनिश भाषकांचे प्राबल्य असले तरी सुमारे १७ टक्के लोक इंग्लिशसुद्धा बोलतात.

भा८. या परिच्छेदामध्ये ''dese, dem, dose, असे बोलणाऱ्यांतली ही व्यक्ती आहे'' ''hoi-toiders'' असे उल्लेख येतात. हे तुच्छतादर्शक आहेत. मराठीमध्ये ''आनी-पानी बोलणारे'' अशा उल्लेखातूनही अशीच तुच्छता दाखविली जाते.

भा९. ''matched guise'' या नावाने ओळखल्या जाणाऱ्या प्रयोगांमध्ये कॅनडामधील इंग्लिश भाषक व फ्रेंच भाषक परस्परांकडे कोणत्या दृष्टीने पाहतात याचे संशोधन करण्यात आले. मॉंट्रिआल या शहरामधील इंग्लिश भाषक विद्यार्थ्यांना एक परिच्छेद प्रथम इंग्लिशमधून ऐकवला व नंतर तोच परिच्छेद फ्रेंचमधून ऐकवला. भाषेकडे दुर्लक्ष करून केवळ बोलणाऱ्यांचा आवाज आणि व्यक्तिमत्त्व यावर त्यांनी लक्ष केंद्रित करायचे होते आणि बोलणाऱ्यांच्या व्यक्तिमत्त्वाच्या काही महत्त्वाच्या पैलूंविषयी निष्कर्ष काढायचे होते. प्रत्यक्षात हे ध्वनिमुद्रित केलेले आवाज पूर्णपणे द्विभाषक व्यक्तींचे होते, व त्यांतल्या प्रत्येकाने इंग्लिश व फ्रेंच भाषकाचा आव आणून (guise) ते परिच्छेद वाचलेले होते; मात्र त्या विद्यार्थ्यांना याची कल्पना दिलेली नव्हती. या प्रयोगातून असे आढळून आले की इंग्लिश भाषकांचे व्यक्तिमत्त्व अधिक देखणे, बुद्धिमान,

सहानुभूतिशील व महत्त्वाकांक्षी असावे असे ऐकणाऱ्या विद्यार्थ्यांना वाटले. नंतर हाच प्रयोग फ्रेंच भाषक विद्यार्थ्यांवर केला असता त्यांच्याही मते इंग्लिश भाषकच अधिक वरच्या दर्जाचे ठरले. यावरून फ्रेंच व इंग्लिश असे दोन्ही भाषक फ्रेंच भाषेला कसे कमी लेखत असत, हे दिसून आले.

भा१०. मार्थाझ् विनयार्ड हे अमेरिकेच्या ईशान्य भागात न्यू इंग्लंडच्या किनारपट्टीजवळ असणारे बेट आहे. येथे स्थानिक इंग्लिश बोलीमध्ये जुने उच्चार टिकवून अस्मिता जपण्याकडे तरुण पिढीचा असणारा कल लबव यांना प्रकर्षाने जाणवला.

**संदर्भ :**


Anshen, F. (1969). *Speech Variation Among Negroes in a Small Southern Community,* unpublished NYU dissertation.

Baily, C-J.N. (1969a). 'The Integration of Linguistic Theory : internal reconstruction and the comparative method in descriptive linguistics', with an appendix of 107 pan-dialectical ordered rules, paper given before Conference on Historical Linguistics in the Light of Generative Theory, Los Angeles.

Baily, C-J.N. (1969b). 'Introduction to Southern States Phonetics', University of Hawaii Working Papers in Linguistics, Vols, 4 and 5.

Blommfield, L.(1944). 'Secondary and Tertiary Responses to Laguage', *Language,* vol. 20, pp. 45-55.

Brown, L. (1969). *The Social Psychology of Variations in French Canadian Speech Styles,* unpublished McGill University dissertation.

Chomsky, N. and Halle, M. (1968). *The Sound Pattern of English,* Harper & Row.

Fischer, J.L.(1958). 'Social influences on the choice of a linguistic variant', *Word,* vol. 14, pp. 47-56.

Fishman, J.A.(ed) (1968). *Readings in the Sociology of Language,* Mouton.

Gumperz, J.J. (1964). 'Linguistic and Social Interaction in Two Communities', in J.J. Gumperz and D. Hymes (eds), 'The Ethnography of Communication', *AmA,* vol. 66, no.6, part 2.

Homans, G.C. (1955). *The Human Group,* Harcout, Mouton.
Kucera, H. (1961). *The Phonology of Czech,* Barce & Word.
Labov, W. (1963). 'The social motivation of a sound change', *Word,* vol. 19, pp. 273-309.
Labov, W. (1965). 'On the Mechanism of Linguistic Change', Language and Linguistics. Monograph No.18, Georgetown University, Washington.
Labov, W. (1966). *The Social Stratification of English in New York City,* Center for Applied Linguistics, Washington.
Labov,w., Cohen, P., Robins, O. and Lewis, J. (1968). *A Study of the Non-Standard English of Negro and Puerto Rican Speakers in New York City,* Final Report, Cooperative Research Project 3288, Vols. 1 and 2, Office of Education, Washington.
Lambert, W.E. (1967), 'A Social psychology of bilingualism', in J. Macnamara (ed.), *Problems of Bilingualism, The Journal of Social Issues,* vol. 23, no.2.
Levine, L. and Crockett, H. J. Jr (1966). Speech Variation in a Piedmont Community : post-vocalic r', in S. Lieberson (ed.) *Explorations in Sociolinguistics, Sociol.Inq.*, vol.36, no. 2.
Shuy, R. Wolfram, W., and Riley, W.K. (1967). *A Study of Social Dialects in Detroit,* Final Report, Project 6-1347, office of Education, Washington.
Strutevant, E. (1947). *An Introduction to Linguistic Science,* Yale University Press.
Wang, W. S-Y (1969). 'Competing Changes as a Cause of Residue', *Language,* vol. 45, pp. 9-25.
Wolfram, W. (1969). Linguistic Correlates of Social Stratification in the Speech of Detroit Negroes, Hartford Seminary Foundation thesis. ■

[ मूळ लेख : W. Labov, 1970. "The Study of Language in its Social Context" in J.B. Pride, & Janet Holmes (eds.) *Sociolinguistics : Seleted Readings.* Harmondsworth, Middlesex: Penguin; 1972 pp. 181-202]

मानव्यविद्या आणि सामाजिक विज्ञान विभाग, आय.आय.टी., पवई, मुंबई 400 076
ई-मेल : malshe@hss.iitb.ac.in
milindmalshe@yahoo.com

# शासनावरी ही फिर्याद

सत्त्वशीला सामंत

नुकतेच सांगलीला ८१वे मराठी साहित्य संमेलन साजरे झाले. नेहमीप्रमाणे विविध परिसंवादांची भाऊगर्दी होतीच. त्यातल्या एका परिसंवादात खुद्द शासनाला आरोपीच्या पिंजऱ्यात उभे केले होते. विषय होता : 'महाराष्ट्र शासनाचे भाषिक (शैक्षणिक) धोरण मराठी भाषेला मारक आहे.' शासनाची बाजू लढवण्याची जबाबदारी शालेय शिक्षणमंत्री श्री. वसंत पुरके यांच्यावर पडली होती. माजी संमेलनाध्यक्ष श्री. अरुण साधूंच्या माघारीमुळे अध्यक्षपदी प्रा. कौतिकराव ठाले-पाटील यांची योजना झाली होती. श्रीकांत येडुरकर यांनी परिसंवादाचे सूत्रसंचालन केले.

पाठ्यपुस्तक-मंडळाच्या अभ्यासमंडळाचे एक माननीय सदस्य श्री. दादा गोरे यांनी परिसंवादाला प्रारंभ केला. महाराष्ट्र राज्यनिर्मितीच्या प्रारंभापासून तत्कालीन मुख्यमंत्री कै. यशवंतराव चव्हाण यांनी सुरू केलेल्या विविध विधायक उपक्रमांचा उल्लेख करून, श्री. गोरे यांनी यशवंतरावांच्या दूरदृष्टीचे कौतुक केले. साहित्य-संस्कृती मंडळ, विश्वकोश निर्मिती मंडळ, विद्यापीठ ग्रंथ निर्मिती मंडळ, भाषा सल्लागार मंडळ, पाठ्यपुस्तक निर्मिती मंडळ यांसारखे काही लक्षणीय उपक्रम त्यांनी दीर्घकाळ राबवले. त्यांनी तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्यासारख्या प्रकांड पंडिताच्या ज्ञानाचा जनतेला लाभ करून दिला. त्यामुळे सरकारी पातळीवर 'मराठी विश्वकोशा'चे अठरा खंड आत्तापर्यंत दिमाखाने प्रकाशित झाले. साहित्य संस्कृति-मंडळातर्फेही सरकारी आश्रयाने अनेक महत्त्वपूर्ण ग्रंथ प्रसिद्ध झाले. तथापि, यशवंतरावांच्या नंतर क्रमश: एकेका उपक्रमाला उतरती कळा लागली. 'विद्यापीठ ग्रंथनिर्मिती मंडळ' बंद पडले. उत्कृष्ट ग्रंथांचे प्रकाशन होऊनही त्या ग्रंथांचा म्हणावा तसा उठाव न झाल्यामुळे ते ग्रंथ सरकारी गोदामात धूळ खात पडले. थोडक्यात, शासकीय उपक्रम स्तुत्य, पण त्यांची अंमलबजावणी सुस्त अशी स्थिती झाली आहे व तिला कारण म्हणजे ढिसाळ शासकीय यंत्रणा असे श्री. गोरे यांचे निदान होते.

भाषा संचालनालयातील निवृत्त भाषा उपसंचालक श्रीमती सत्त्वशीला सामंत यांनी प्रारंभीच आपणांस देण्यात आलेल्या उपविषयाची ('भाषिक शैक्षणिक धोरण') मर्यादा

स्पष्ट केली व त्या अनुषंगाने विषयाची मांडणी केली. १९५३ व १९५७ या काळात उत्तर प्रदेशात झालेल्या हिंदी परिषदांच्या निर्णयानुसार सरकारी लेखनात जोडाक्षर पद्धतीऐवजी तोडाक्षर पद्धती सुरू झाली. त्या काळी टंकलेखन यंत्र हे सरकारी कारभाराचे मुख्य साधन होते व त्या यंत्रावर 'द्'पासून सुरू होणारी जोडाक्षरे टंकलिखित करता येत नव्हती. तेवढे निमित्त करून हिंदी परिषदेने व केंद्रीय शिक्षण मंत्रालयानेही तोडाक्षर-पद्धतीला सर्रास मान्यता दिली व ती शिफारस त्यांनी राज्य सरकारांकडे पाठवली. वस्तुतः, छपाई-तंत्रात परंपरागत जोडाक्षरांना कसलीच अडचण नव्हती; परंतु आज्ञाधारक महाराष्ट्र सरकारने राज्यातील विद्वानांचा सल्ला न घेता, डोळे झाकून ती शिफारस मान्य केली व शासनमान्य अशी मराठी वर्णमाला जारी केली. ही वर्णमाला कायद्यानुसार सर्वच शासकीय स्तरांवर बंधनकारक असूनही प्रत्यक्ष व्यवहारात पाठ्यपुस्तक मंडळ सोडून इतर कोणत्याही कार्यालयाने ती अमलात आणली नाही ! पाठ्यपुस्तक मंडळाने मात्र पाठ्यपुस्तकांतून तिचे कसोशीने पालन केले. त्यातही आणखी एक घोटाळा असा की संस्कृतच्या पाठ्यपुस्तकांतील संस्कृत पाठांमध्ये पारंपरिक जोडाक्षरे ('शुद्ध', इ.) व त्याखालील मराठी प्रश्नांमध्ये अभिनव तोडाक्षरे ('शुद्‌ध') असा दुहेरी खाक्या चालू ठेवला व त्यामुळे विद्यार्थ्यांची कुचंबणा होत आहे हे श्रीमती सामंत यांनी निदर्शनाला आणले. गेल्या दहा-बारा वर्षांपासून हरतऱ्हेचे प्रयत्न केल्यानंतर, 'राज्य मराठी विकास संस्था' व 'साहित्य महामंडळ' या दोघांकरवी वर्णमालेसंबंधी नवीन शासननिर्णयाचा प्रस्ताव २००२ साली शासनाकडे पाठवण्यात आला. पण येथेही शासकीय यंत्रणेने पुन्हा घोडचूक केली आणि सर्वस्वी राज्य सरकारच्या अखत्यारीतील हा प्रस्ताव २००६ साली पुढील मान्यतेसाठी पुन्हा केंद्र सरकारकडे पाठवला ! आजतागायत केंद्र सरकारकडून कसलाही प्रतिसाद आलेला नाही ही गोष्ट श्रीमती सामंत यांनी शालेय शिक्षणमंत्री श्री. वसंत पुरके यांच्या नजरेस आणून दिली. शासकीय यंत्रणेत जागोजागी बसलेले झारीतले शुक्राचार्य हेच मराठीच्या मार्गातले खरे अडसर आहेत, असे श्रीमती सामंतांनी ठासून सांगितले.

'दै. लोकसत्ता'मधील एक धडाडीच्या पत्रकार श्रीमती शुभदा चौकर या सध्या 'मित्र मराठी शाळांचे' ही चळवळ चालवीत आहेत. दिवसेंदिवस इंग्रजी माध्यमाकडे वाढत असलेला पालकांचा ओढा थोपवण्यासाठी त्या शाळाशाळांमध्ये जाऊन व पालक-सभा घेऊन त्यांचे प्रबोधन करीत असतात. परिसंवादातील आपल्या भाषणामध्ये त्यांनी मराठी शाळांची दयनीय स्थिती, संपन्न वर्गातील विद्यार्थ्यांसाठी उभे राहणारे इंग्रजी शाळांचे चकचकीत 'मॉल्स' आणि त्यामुळे त्या दोहोंतील रुंदावत जाणाऱ्या दरीचे विदारक चित्र उभे केले. मराठी शाळांतील 'मराठीतून शिक्षण' व 'मराठीचे शिक्षण'

ही दोन्ही कशी सकस होतील व त्याचबरोबर इंग्रजी भाषा-शिक्षणाचा दर्जा कसा उंचावेल याकडे लक्ष दिल्यास, मराठी शाळांचे आकर्षण वाढेल असे त्यांनी सांगितले. 'पहिलीपासून इंग्रजी' हा पर्याय आपणांस स्वागतार्ह वाटतो; पण सेमी-इंग्लिश (विज्ञान, गणित इंग्रजीतून) हा पर्याय मात्र धोकादायक आहे असाही इशारा त्यांनी दिला. 'बालपणापासून इंग्रजीशिवाय तरणोपाय नाही' असा नसता बागुलबुवा निर्माण केला जात आहे, त्याला आपण बळी पडता कामा नये असे त्या म्हणाल्या.

विदर्भातील एक निवृत्त प्राचार्य श्री. उत्तम रुद्रवार यांच्या घणाघाती भाषणाने परिसंवादात जोश आला. जागतिकीकरणाच्या भयगंडाने पछाडलेल्या मराठी समाजात इंग्रजीच्या अनुषंगाने मराठीबद्दलही कसा न्यूनगंड निर्माण झाला आहे हे त्यांनी समर्पक दाखले-दृष्टान्त देऊन विशद केले. स्वभाषेची पीछेहाट झाली की आपोआप संस्कृतीचाही अपकर्ष होत जातो असे सांगून, त्यांनी मराठी समाजाला संस्कृति-ऱ्हासापासून सावध राहण्याचा सल्ला दिला. बालक-मंदिरापासून इंग्रजी शिक्षणाचा सोस धरणाऱ्या सरकारलाही त्यांनी धारेवर धरले.

ह्या परिसंवादात संयोजकांनी एका महाविद्यालयीन युवतीला - कु. अभिलाषा जगताप हिलाही - संधी दिली होती. तिने अत्यंत धिटाईने प्रचंड श्रोतृसमुदायासमोर मातृभाषेविषयीचे आपले विचार मांडले.

शालेय शिक्षणमंत्री श्री. वसंत पुरके हे आधीच्या वक्त्यांच्या भाषणांतील मुद्द्यांची टिपणे घेत होते. त्यामुळे आपल्या भाषणात ते या मुद्द्यांची दखल घेऊन त्यांना उत्तरे देतील अशी अपेक्षा होती. तथापि, त्यांच्याकडून ती पूर्ण झाली नाही. सुरुवातीलाच त्यांनी आपण लवकरच व्यासपीठावरील संबंधित वक्त्यांची एक बैठक बोलावू असे आश्वासन दिले. सर्व लोक शासनाचा पायपुसण्यासारखा उपयोग करून घेतात व तरीही त्याच्यावर टीकास्त्र सोडून त्याला पायतळी तुडवतात असे सांगून, पुढे त्यांनी शासनामार्फत साहित्य-पुरस्कार, तमाशादि कलांचे महोत्सव भरवून त्यांच्यासाठी प्रोत्साहनपर योजना, वृद्ध कलावंतांसाठी पेन्शन योजना, इ० उपक्रमांद्वारे शासन मराठीबद्दल किती आस्था दाखवते याचे तपशीलवार वर्णन केले. ज्ञानेश्वरीपासून ते कवी ग्रेसपर्यंतच्या साहित्यिकांची मुखोद्गत अवतरणे उद्धृत करून शिक्षणमंत्र्यांनी आपल्या ओघवत्या वाणीने सकृत्दर्शनी श्रोत्यांवर छाप पाडली.

शिक्षणमंत्र्यांचे भाषण बरेच लांबल्यामुळे अखेरीस सभाध्यक्ष प्रा. कौतिकराव ठाले-पाटील यांना समारोप करण्यास पुरेसा वेळ मिळाला नाही. तरीही त्यातल्या त्यात प्रा. ठाले-पाटील यांनी पाठ्यपुस्तकांतील शेकडो चुका पाठ्यपुस्तक-मंडळाच्या निदर्शनाला आणूनही मंडळाने एक शुद्धिपत्रक जोडण्यापलीकडे त्यांची फारशी गंभीर

दखल घेतली नाही याबद्दल निषेध व्यक्त केला. मूळ पुस्तकाला पुस्तकापेक्षाही मोठे शुद्धिपत्र जोडण्याने, विद्यार्थी-शिक्षणाची झालेली हानी भरून निघत नाही, म्हणून मंडळाने याबाबत विशेष दक्षता घ्यायला हवी या मुद्द्यावर त्यांनी विशेष भर दिला.

परिसंवादाला शिक्षक-पेशातील श्रोत्यांची प्रचंड गर्दी झाली होती. शिक्षकांव्यतिरिक्त इतरही अनेक सुशिक्षित नागरिकांनी मोठ्या उत्सुकतेने परिसंवादाला हजेरी लावली होती त्याअर्थी, समाजातील बुद्धिवंतांना शिक्षणक्षेत्रातील सद्य:स्थितीबद्दल चिंता वाटत आहे असे म्हणावयास हरकत नाही. ■

16, यशोदा कुंज सोसायटी, तेजस नगर, कोथरुड, पुणे 411 038.
दूरध्वनी (020) 25383755

---

# पक्षी - मुलगा

रशियाच्या प्रसारमाध्यमांनी, एक पक्षी-मुलगा शोधून काढला आहे. या तथाकथित जंगली मुलाचे वय ७ वर्षे सांगितले जात असून, आपण एक रानकोंबडा (Fowl) आहोत असे त्याला वाटते; कारण तो (मानवी संपर्काशिवाय) फक्त पक्ष्यांच्या संगतीत वाढला आहे. गेल्या आठवड्यात शासकीय बाल संगोपन कर्मचाऱ्यांनी त्याला ताब्यात घेतले. त्याच्या विक्षिप्त स्वभावाच्या आईने पाळलेल्या जंगली पक्ष्यांचे कळप आणि पक्ष्यांचे पिंजरे यांनी भरलेल्या निवासस्थानात तो वाढला आहे. हे पक्षी त्याच्या विक्षिप्त स्वभावाच्या आईने पाळले असून ती त्या पक्ष्यांवर प्रेम करी, पण आपल्या मुलाकडे पूर्णतया दुर्लक्ष करी; असे वृत्त 'प्रवदा-रु' या नियमकालिकाच्या संगणकीय आवृत्तीने दिले आहे.

'या मुलाशी बोलण्याचा आरंभ करताच तो चिवचिवाट करतो' असे गालिना व्होल्स्काया या व्होल्गोग्राड येथील सामाजिक कार्यकर्तीनं म्हटल्याचे त्या वृत्तपत्राने उद्धृत केले आहे. ''त्या मुलाला मानवी भाषा मुळीही समजत नाही. तो फक्त चिवचिवाट करतो. आपले (म्हणणे) इतरांना समजत नाही, हे ध्यानात आल्यावर, पक्षी पंख फडफडवतात त्या पद्धतीने तो हात हलवायला लागतो.'' असे ती म्हणाली.

किपलिंगच्या 'जंगलबुक'मधील 'मोगली' या सर्वपरिचित व्यक्तिरेखेवरून रशियन डॉक्टरांनी या प्रकाराचे 'मोगली लक्षण-समुच्चय' असे नामकरण केले आहे, आणि अलीकडच्या वर्षांत प्राणीसहवासात वाढलेली किमान पाच रशियन मुले सापडली असल्याचेही नमूद केले आहे. सदर मुलाचे नाव अधिकारीवर्गाने गुप्त राखले असून, त्याला व्होल्गोग्राडमधील निराधारगृहात दाखल केले आहे आणि तेथेच त्याच्यावर भाषिक आणि वैद्यकीय उपचार केले जात आहेत. ■

'हिंदुस्तान टाइम्स' (मुंबई आवृत्ती) 28.02.2008

(प्रेषक : उमाकांत रा. कामत, 102/4 एन, अशोकनगर, परांजपे मार्ग, बोरीवली (प.) मुंबई 400092)

---

# पूर्व खानदेशाच्या बोलींचा परस्परांवर प्रभाव : एक अभ्यास

वासुदेव सोमाजी वले

खानदेश आणि विदर्भ हे दोन्ही प्रदेश एकमेकांशेजारी आहेत. त्यामुळे त्या त्या बोलींचा प्रभाव सीमाप्रदेशात दिसून येतो. महाराष्ट्र राज्याच्या वेगवेगळ्या भागात वेगवेगळ्या बोली बोलल्या जातात. त्या बोलींना प्रदेशाच्या नावावरून नाव देण्याची तसेच एखाद्या जातीच्या लोकांच्या बोलीला त्या जातीवरून नाव देण्याची प्रथा पूर्वीपासूनच दिसून येते. उदा० खानदेश-खानदेशी, कोकण-कोकणी, विदर्भ-वऱ्हाडी/वैदर्भी, मराठवाडा-मराठवाडी, भिल्ल-भिल्ली, पावरा-पावरी, लेवापाटीदार-लेवापाटीदारी इत्यादी.

एखाद्या नकाशात जसा भौगोलिक, राजकीय प्रदेश दर्शविला जातो, तसा लोकभाषांचा/बोलीभाषांचा प्रदेश नकाशात दर्शविता येत नाही. कारण बोलीभाषांच्या सीमा ठरविता येत नाहीत. प्रत्येक प्रदेशात फक्त एकच बोली बोलली जात नाही तर व्यक्ती ज्या आर्थिक, सामाजिक, भौगोलिक परिसरातून, स्थितीतून येतात त्यानुसार त्यांची बोलीही वेगवेगळी असते.

खानदेश आणि विदर्भ या प्रदेशाच्या सीमाभागात अहिराणी, वऱ्हाडी ह्या बोली एकमेकींच्या प्रदेशात कमीअधिक प्रमाणात बोलल्या जातात. याबरोबरच या सीमाप्रदेशात 'लेवापाटीदारी' व 'तावडी' ह्या बोलीही बोलल्या जातात. तसेच काही जातीनिहायही बोली बोलल्या जातात, पण त्या फक्त दैनंदिन व्यवहारासाठीच. खानदेश आणि विदर्भ सीमाप्रदेशात बोलल्या जाणाऱ्या अहिराणी, वऱ्हाडी, लेवापाटीदारी, तावडी या चारही लोकभाषांमध्ये काही प्रमाणात साम्य दिसून येते, ते मी या ठिकाणी मांडण्याचा प्रयत्न करणार आहे. यातूनच त्यांचा एकमेकींवर कसा प्रभाव पडतो आहे याचा विचार करता येतो. प्रथम त्या त्या बोलीभाषेचे क्षेत्र व नंतर त्यांच्यातील साम्य यांचा विचार पुढे करण्यात आला आहे.

(१) **अहिराणीचे क्षेत्र :** जळगाव, धुळे, नंदुरबार या तीन जिल्ह्यांचा व नाशिक जिल्ह्याचा काही भाग हा खानदेश या प्रादेशिक नावाने ओळखला जातो. या प्रदेशात बोलली जाणारी बोली अहिराणी. खानदेशातील 'आभीर' लोकांची बोली म्हणून तिला 'अहिराणी' असे नाव पडले.

खानदेशात एकच बोली बोलली जात नाही. त्याविषयी डॉ. किसन पाटील म्हणतात, ''अहिराणी ही खानदेशची प्रमुख बोली असली तरी तिच्या जवळपास अनेक बोली विकसित असून त्या लोकसमूहात प्रचलित आहेत. अहिराणी, भिल्ली, पावरी, मावची, तावडी, लेवापाटीदारी, गुजरी, डांगी, कोकणी, ठाकरी, वारली, घाटोळी, बागलाणी, लाडशिक्की, निमाडी, तडवी, काटोली, तिरोळी इत्यादी बोली खानदेशात रूढ आहेत.'' (पाटील, डॉ. किसन, २००६:३४) खानदेशात बोलल्या जाणाऱ्या अहिराणी बोलीची काही वैशिष्ट्ये सीमाप्रदेशातील इतर बोलींतही दिसून येतात.

(२) वऱ्हाडीचे क्षेत्र : बुलढाणा, अकोला, वाशिम, अमरावती, वर्धा, चंद्रपूर, यवतमाळ, गोंदिया, गडचिरोली, नागपूर, भंडारा हे अकरा जिल्हे 'वऱ्हाड' या प्रादेशिक नावाने ओळखले जातात. या वऱ्हाडात बोलली जाणारी बोली ती वऱ्हाडी. वऱ्हाडीचे क्षेत्र विस्तृत असल्यामुळे वऱ्हाडात वऱ्हाडीबरोबरच नागपुरी, हळबी, बालाघाटी, झाडी इत्यादी बोली बोलल्या जातात. वऱ्हाडीचे खरे रूप आपणास पश्चिम विदर्भातील बुलढाणा, अकोला, वाशिम, अमरावती या जिल्ह्यांमध्ये दिसून येते. या वऱ्हाडी बोलीची काही वैशिष्ट्ये सीमाप्रदेशातील इतर बोलींतही दिसून येतात.

(३) लेवापाटीदारी बोलीचे क्षेत्र : ''स्थूलमानाने लेवापाटीदारी बोलीच्या चतु:सीमा तापी नदीपासून उत्तरेकडे यावल व चोपडा तालुक्यांची सातपुड्याच्या पायथ्यापर्यंतची सीमा, उत्तरेकडे यावल व रावेर तालुक्यात खानापूरपर्यंतच्या सातपुड्याचा पायथा, खानापूरपासून पूर्वेकडे रावेर व मुक्ताईनगर तालुक्यांची मध्यप्रदेशास लागून असलेली सीमा, मुक्ताईनगर व जळगाव-जामोद तालुक्यांची पूर्णा नदीपर्यंतची सीमा, मलकापूर व नांदूरा तालुक्यांच्या उत्तरेस पूर्णा नदी, नांदूरा व मोताळा तालुक्यांची पूर्वसीमा, मोताळा तालुक्यांची अजिंठा पायथ्याची दक्षिण सीमा, मोताळा तालुक्यातील रोहिनखेड ते बोदवड, बोदवड ते जामनेर तालुक्यातील नेरीपर्यंत, नेरी ते जळगाव तालुक्यातील गिरणेकाठावरील धानोरेपर्यंत व धानोऱ्याच्या उत्तरेस गिरणानदी-तापी संगमापर्यंत. याच्या बाहेरही पाल, रावेर, अमळनेर तालुक्यातील नांदेड, एरंडोल तालुक्यातील साळवे, निशान बु।।, टहाकळी आणि चाळीसगाव तालुक्यातील हातले व वाघळी ही गावेही आहेत. या प्रदेशात तापी, पूर्णा, गिरणा ह्या मुख्य नद्या असून भोकर, सुकी, मोर, हरकी, वाघूर, कांग आणि विश्वगंगा ह्या त्यांच्या महत्त्वाच्या उपनद्या आहेत.'' (पाटील नि.रा., २००५:६३)

लेवापाटीदार समाज हा ज्या ज्या ठिकाणी सुपीक जमिनी होत्या त्या त्या ठिकाणी वास्तव्य करून राहिला. लेवापाटीदारी बोलण्याची एक वेगळ्या पद्धतीची

लय आहे. लेवापाटीदारी बोलीला ‘खानदेशी - वऱ्हाडी’ असेही म्हणतात, कारण या बोलीवर खानदेशातील अहिराणी व विदर्भातील वऱ्हाडी बोलीचा प्रभाव दिसून येतो.

**(४) तावडी बोलीचे क्षेत्र :** जामनेर तालुक्यातील विदर्भ-मराठवाड्यालगतच्या परिसरात तावडी बोली बोलली जाते. ‘‘खानदेशातील काही भागातील बोलीभाषेवर वैदर्भी आणि मराठवाड्याची बोली यांचा प्रभाव आढळतो. अशा बोलीला तावडी म्हणून ओळखले जाते. ही तावडी बोली पाचोरा तालुका, जामनेर तालुका, व सोयगाव तालुक्यालगतची घोसला, वरखेडी, जळके इत्यादी गावांतून आढळते. जेथे वैदर्भी बोली, अहिराणी बोली आणि मराठवाड्याची बोली संपल्यासारख्या वाटतात त्या भूक्षेत्रात बोलींचे मिश्रण असणारी तावडी बोली आढळते.’’ (सूर्यवंशी, डॉ. रमेश. १९९७:९) येथे आलेले तावडी बोलीचे क्षेत्र खूप कमी वाटते. ‘‘तावडी बोली ही अजिंठ्याच्या डोंगराचा पायथा, अजिंठा गाव, पहूर, पाळधी, लोहारा, सोयगाव, शेंदूर्णी, वरखेडी, वाकोद, जामनेर, नेरी, सावळतबारा, कापूसवाडी, तोंडापूर, वाकडी, फत्तेपूर, सुनसगाव, भुसावळ, वरणगाव, एदलाबाद, कर्की, अंतुर्ली, खानापूर, वाघोड, रावेरचा पूर्व भाग, निमांड प्रांतातला शहापूर, इच्छापूर वगैरेचा भाग या तावडी बोली क्षेत्रात येतो.’’ येथील लोकांचा रोटी बेटी व्यवहार व्यापक प्रमाणात आहे.

‘‘या बोलीसाठी ‘जामनेरी बोली’ हे डॉ. कैलास सार्वेकरांनी केलेले नामाभिधान (क्षेत्राचा) संकोच केल्यासारखे वाटते. तिचे व्यापक स्वरूप तावडी बोली रूपाने लक्षात घ्यायला हवे.’’ (पाटील, डॉ. किसन/ २००६)

अशोक कौतिक कोळी यांच्या ‘कूड’मधील कथा आणि ‘पाडा’ या कादंबरीतील संवाद प्रस्तुत प्रदेशाच्या तावडी बोलीत आहेत. त्या बोलीवर अहिराणी, मराठवाडी, लेवापाटीदारी, वऱ्हाडी, निमाडी अशा बोलींचा प्रभाव मान्य करावा लागतो. कारण त्या बोलींचे परस्परांशी जवळचे नाते आहे.

अहिराणी, वऱ्हाडी, लेवापाटीदारी, तावडी ह्या बोली पूर्व खानदेश आणि पश्चिम विदर्भ या भागात बोलल्या जातात. या सीमाप्रदेशातील लोकजीवनाचा अभ्यास करताना असे जाणवते की या प्रदेशात बोलल्या जाणाऱ्या बोलींचा एकमेकींशी अनुबंध आहे. यातील प्रत्येक बोलीत एकमेकींची काही वैशिष्ट्ये दिसून येतात. कोणत्याही दोन बोलींतील सीमारेषा प्राकृतिक नकाशाद्वारे दाखविता येत नसल्या तरी त्यांच्या वैशिष्ट्यांनुसार त्यांच्यातील साम्य/वेगळेपणा शोधता येतो. अशा या चारही बोलींच्या वैशिष्ट्यांमध्ये काही साम्ये आढळतात :

१. प्रमाणमराठीत वापरला जाणाऱ्या ‘ळ’च्या ऐवजी अहिराणी, वऱ्हाडी,





अनुक्रमणिका

लेवापाटीदारी, तावडी बोलींत 'य' वापरतात.

उदा० जळगाव-जयगाव, काळा-काया, गुळ-गुय, मुळा-मुया इत्यादी.

२. प्रमाणमराठीतील 'ण'च्या ऐवजी अहिराणी, वऱ्हाडी, लेवापाटीदारी, तावडी बोलींत 'न' येतो.

उदा० पण-पन, बहिण-बहिन, अंथरूण-अंथरून इत्यादी.

३. प्रमाणमराठीतील शब्दारंभी येणाऱ्या 'वि'ऐवज़ी अहिराणी, वऱ्हाडी, लेवापाटीदारी, तावडी बोलींत 'इ' येतो.

उदा० विस्तव-इस्तव, विचार-इचार, विळा-इया, वीस-इस इत्यादी.

४. शब्दारंभी येणाऱ्या 'ओ'चा उच्चार अहिराणी, वऱ्हाडी, लेवापाटीदारी, तावडी बोलींत 'व' असा होतो.

उदा० ओटा-वटा, ओटी-वटी, ओतणे-वतने, ओझ-वझ, ओझर-वझर, ओंकार-वंकार इत्यादी.

५. स्थळ, वेळ व काळ दर्शविणाऱ्या क्रियाविशेषणांचा उच्चार वऱ्हाडी, लेवापाटीदारी, तावडी बोलीत सारखाच होतो.

उदा० येथे / इथे – अठी / अढी
तेथे – तठी / तढी
कोठे – कुठी / कुढी

६. प्रमाणमराठीतील 'ऐ'चा अहिराणी, वऱ्हाडी, लेवापाटीदारी, तावडी बोलीत 'अय' असा उच्चार होतो.

७. प्रमाणमराठीतील नपुसकलिंगी रूपातील अन्त्य 'ए'च्या जागी अहिराणी, वऱ्हाडी, लेवापाटीदारी, तावडी बोलींत दीर्घ 'अ' येतो.

उदा० सांगितले-सांगितलं/सांगलं, त्याने-त्यानं इत्यादी.

८. प्रमाणमराठीतील 'स्व'च्या जागी अहिराणी, वऱ्हाडी, लेवापाटीदारी, तावडी बोलीत 'सो' वापरतात.

उदा० स्वत:-सोता, सरस्वती-सरसोती, स्वदेशी-सौदेशी इत्यादी.

९. प्रमाणमराठीतील चारायले, राखायले, करायले या रूपांऐवजी अहिराणी, वऱ्हाडी, लेवापाटीदारी, तावडी बोलीत 'चाऱ्याले, राख्याले, कऱ्याले' अशी रूपे वापरली जातात.

१०. प्रमाणमराठीतील काही शब्दांतील अहिराणी, वऱ्हाडी, लेवापाटीदारी, तावडी बोलींत 'अ' या स्वराऐवजी बऱ्याच वेळा 'आ' स्वर वापरतात.

उदा० अवजड-आवजड, असा-आसा इत्यादी.





अनुक्रमणिका

समारोप : पूर्व खानदेश व पश्चिम विदर्भ या खानदेश आणि विदर्भ सीमाप्रदेशात बोलल्या जाणाऱ्या वऱ्हाडी अहिराणी, लेवापाटीदारी, तावडी या बोलींचा एकमेकींवर प्रभाव दिसून येतो असे म्हणता येईल. त्यामुळे त्यांच्यामध्ये साम्य दिसून येते.

संदर्भ : डॉ. पाटील, किसन/ २००६. 'भाषा आणि जीवन' वर्ष २४, अंक १, हिवाळा पृ. ३४

डॉ. पाटील किसन, परिसंवाद - तिसरे बोली साहित्य संमेलन भुसावळ दि. ४ व ५ फेब्रु. २००६

पाटील, नि. रा. २००५ 'खानदेश - वऱ्हाडातील लेवापाटीदार समाज - एक अन्वयार्थ'. जळगाव जिल्हा लेवापाटीसार मंडळ, जळगाव.

डॉ. सूर्यवंशी, रमेश. १९९७. अहिराणी - भाषावैज्ञानिक अभ्यास'. अक्षय प्रकाशन, पुणे ३०. ■

मराठी विभाग, श्री. शेठ मु. मा. महाविद्यालय, पाचोरा, जि. जळगाव.
दूरध्वनी : 02596 - 244990

---

**मुखपृष्ठासंबंधी**

ॐकाराच्या ध्वनि-स्वर वैविध्यापासून ते कवितेची आशयघनता दृष्यमान करण्यापर्यंत; देवनागरी लिपीच्या विविध सुलेखन शैलींपासून ते संगणकीय संकल्पन स्वरूपापर्यंत; बाळबोध लिपीपासून ते विविध भारतीय लिप्यांसाठी उपयोजिता येण्याजोग्या 'देशनागरी' लिपीत नववर्षाच्या शुभेच्छा व्यक्त करण्यापर्यंत.

प्रख्यात अक्षरतज्ज्ञ प्रा. रकु जोशी यांच्या संशोधक, सुलेखक आणि दृष्य-अक्षर कवि या निवडक पैलूंचा वेध घेणारं मुखपृष्ठ.

---

# अहिराणी - मराठी बडबडगीते

अरुण देवरे

### माशेराव

झेपतस पानीमा,
सुरकन् असं-
नई, का, व्हस,
सरदी पडसं ?

माशेराव,
माशेराव,
येऊ का, दरवाले
पानीना गाव...?

### मासेराव

पोहता पाण्यात
सुळ्कन असे,
नाही का होत-
सर्दी पडसे ?

मासेराव,
मासेराव,
येऊ का बघायला
पाण्याचा गाव ?

### गॉगलबॉय

गॉगलबॉय नाकमा नकट्या
ठेंग्या ठुसक्या बुटक्या खुरट्या,

केससना काढस सुंदर कोंबडा,
सुटबूट घालस रुबाबमा बडा,

धमाल करस डिस्कोना नाच,
तिरळ्या पोरी हासतीस पाच,

नाच नाचस दमी जास्स खूप,
पेत बसस टमाटानं सूप.

### गॉगलबॉय

गॉगलबॉय नाकात नकटा
ठेंगणा ठुसका बुटका खुरटा...

केसांचा काढतो छानदार कोंबडा,
सूट-बूट घालतो रुबाब बडा...

धमाल करतो डिस्को नाच,
चकण्या पोरी हसतात पाच...

नाचनाचतो दमतो खूप
पित बसतो टोमॅटो सूप.

■

एव्हरेस्ट, डी/5, 510, गोल्डन पार्क, कल्याण (प.), जि. ठाणे.
भ्रमणध्वनी : 9833829350



अनुक्रमणिका








# स्थलांतरितांच्यामुळे मराठीला नवीन स्पर्धक !

**रमेशचंद्र पाटकर**

[ संदर्भ : 'महाराष्ट्रात येणारे परप्रांतीय' (याच अंकातील पृ. ६२-६३) ]

महाराष्ट्रात - विशेषतः मुंबईत - उत्तर भारतातून (प्रथम उत्तरप्रदेश, नंतर बिहार) हिंदी भाषिक नागरीक पोटापाण्याच्या उद्योगासाठी येत होते. दूध, टॅक्सी, भाजीपाला, फळे, इस्त्री इ० व्यवसाय ते करत होते आणि आजही ते करत आहेत. महाराष्ट्रात छोट्यामोठ्या उद्योगधंद्याचा जसजसा विकास होऊ लागला तसतसे या हिंदी भाषकांचे 'स्थलांतरा'चे प्रमाण वाढू लागले. मुंबईच्या बहुभाषिक-सांस्कृतिक (कॉस्मोपॉलिटन) पर्यावरणात स्वत:ची भाषिक व सांस्कृतिक 'ओळख' (आडेन्टिटी) टिकवून ठेवण्याचा त्यांचा प्रयत्न सुरू होता.

एका बाजूला महाराष्ट्रात मराठी माध्यमातील शाळांना इंग्रजी माध्यमांच्या शाळेशी 'स्पर्धा' करावी लागत असतानाच दुसऱ्या बाजूला महाराष्ट्रात - बऱ्याच अंशी मुंबईत हिंदी माध्यमांच्या शाळांशी 'स्पर्धा' हळूहळू करावी लागणार आहे असे अनुमान काढले तर त्यात आश्चर्य वाटू नये. आज तरी हिंदीच्या तुलनेत इंग्रजी ही मराठीची प्रथम क्रमांकाची स्पर्धक आहे. हिंदीमुळे मराठी भाषेच्या समस्येला एक नवा आयाम (डायमेन्शन) मिळण्याची शक्यता नजरेआड करून चालणार नाही. मराठी वृत्तपत्रे, दूरदर्शनवरील मराठी बातम्या यांच्याकडे सहज जरी लक्ष दिले तरी हिंदी भाषेतील शब्दांचा कसा व किती उपयोग केला जात आहे, हे लक्षात येईल. आज तर काही मान्यवर वृत्तपत्रांत 'खेळ' व 'राजकारण' यांच्या संदर्भातील बातम्यांचे मथळे 'इंग्रजी' शब्दांत (अर्थात त्यांच्या मराठी उच्चारांत व देवनागरी लिपीत) असतात. आज आपल्याला हिंदी भाषेतील दैनिके, सांज-दैनिके पाहायला मिळतात. मराठी भाषिक सांज-दैनिकांचे व्यवस्थापक हिंदी भाषिक सांज-दैनिकेही प्रकाशित करताना दिसतात.

संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेनंतर मराठी भाषेचा विकास होईल (अनेक व्यावहारिक व संपर्क क्षेत्रांत) अशी अपेक्षा बाळगली गेली होती. पण आज तिचे भवितव्य 'अधांतरी' लोंबकळताना दिसत आहे.

मुंबईत इमारतींच्या बांधकामाला जोराची गती मिळाल्यावर व त्या पूर्वीही तेलुगु

भाषिक मजूर स्त्री-पुरुषांचे 'स्थलांतर' झाले आहे. पण त्यांच्या कामाचे स्वरूप 'तात्पुरत्या' वर्गात मोडणारे असल्यामुळे हा भाषिक समूह कायमची वस्ती करणारा नव्हता आणि नाही. पण हिंदी भाषकांचे तसे नाही. महाराष्ट्रात आल्यावर आपल्या कामाची घडी व्यवस्थित बसल्यावर ते आपला मुक्काम प्रस्थापित करतात. एवढेच नव्हे तर आपल्या मराठी भाषिक ग्राहकांशी ते मराठीत 'संदेशन' (कम्युनिकेशन) करण्याचा प्रयत्न करतात. इतर राज्यांची - विशेषत: तिथल्या महानगरांतील वस्तुस्थिती काय आहे, हे मला ठाऊक नाही. प्रत्यक्ष अनुभव, वृत्तपत्रांतील माहिती व इतरांकडून समजलेली वृत्ते यावर आधारलेले माझे वरील निरीक्षण आहे.

महाराष्ट्रातील भाषिक नकाशाचा 'रंग' हळूहळू बदलत आहे याची जाणीव गेल्या फेब्रुवारीच्या मध्यास जो 'राजकीय भडका' उडाला त्यावरून झाली. त्या संदर्भात 'टाइम्स ऑफ इंडिया'त (१७ फेब्रुवारी २००८) प्रसिद्ध झालेली खालील माहिती उपयुक्त ठरावी : ''महाराष्ट्रात बोलल्या जाणाऱ्या भाषांचा तुलनात्मक अभ्यास 'टाटा इन्स्टिट्यूट ऑफ सोशल सायन्सेस'च्या संशोधन विभागाने केला आहे. त्यावरून असे दिसून येते की महाराष्ट्रातील हिंदी भाषा बोलणाऱ्या लोकांच्या संख्येत गेल्या २० वर्षांत (१९८१ ते २००१) दोनतृतीयांश पटीने वाढ झाली आहे. १९८१ साली ती ६.७ टक्के होती; २००१ साली ती ११ टक्के एवढी वाढली.''

ज्या वृत्तात वरील आकडेवारी दिली आहे, त्याच वृत्तात राजकीय भडक्याशी संबंधित असणाऱ्या एका पक्षाच्या नवी मुंबईतील युनिटच्या अध्यक्षाने दिलेली माहिती आहे. हे अध्यक्ष 'स्मॉल स्केल आन्त्रप्रनर्स ॲसोसिएशन'च्या 'एम्आयडीसी-ट्रान्सठाणे-क्रिक'च्या 'कोअर ग्रुप'चेही अध्यक्ष आहेत. त्यांच्या म्हणण्यानुसार नवी मुंबईतील लघुउद्योग केंद्रात उत्तर भारतातील १.२ लाख लोक काम करत आहेत. एम्.आय्.डी.सी.च्या ३,८०० औद्योगिक केंद्रांत काम करणाऱ्या दोन लाख कर्मचाऱ्यांपैकी ६० टक्के कर्मचारी हे उत्तर प्रदेश व बिहारमधून आले आहेत.

जागतिकीकरणाच्या रेट्यात जीवनाशी संबंधित असणाऱ्या इतर महत्त्वाच्या क्षेत्रांप्रमाणे भारतीय भाषांपुढे एक महत्त्वाचे आव्हान उभे राहिले आहे. मराठी भाषा ही देखील त्याला अपवाद नाही. कोणत्याही भाषिक क्षेत्राला सांस्कृतिक, सामाजिक संदर्भांबरोबरच राजकीय व आर्थिक संदर्भ असतात, हे विसरून चालणार नाही. मराठी भाषेचा प्रश्न बहुआयामी बनलेला आहे, एवढेच लक्षात आणून देण्यासाठी हा 'मजकूर' लिहिला आहे.

■

21-शांतिनिकेतन, काशिनाथ धुरू रोड, कीर्ती कॉलेजसमोर, दादर (प.), मुंबई 400028
दूरध्वनी : 24374786





अनुक्रमणिका

# सीमेवरचा भाषासंसार

देवानंद सोनटक्के

महाराष्ट्र-कर्नाटक सीमेवर कोल्हापूरच्या दक्षिणेस २५ कि.मी. अंतरावरच्या हुपरी या गावी मी प्राध्यापक आहे. हे गाव कर्नाटक सीमेपासून ४ कि.मी. अंतरावर. मी दोन वर्षांपासून इथे राहतोय. मूळचा नागपूरचा. वऱ्हाडी ही विदर्भाची बोली; माझा अध्यापनाचा विषय मराठी. पहिल्यांदाच या भागात आलोय. माझे अध्यापन प्रमाण-मराठीतीलच. पण पहिल्याच दिवशी माझ्या लक्षात आले, की विद्यार्थी नुसतेच आश्चर्याने बघताहेत. मला वाटले, आपले बोलणे कळताहे की नाही ? मुले म्हणाली, ''तसं नाय, सर, तुम्ही आकाशवाणीसारखं बोलायलायसा !''

सुरवातीला खानावळीत जेवायचो. आमच्याकडे जेवणात रोज वरण असते. इकडे आमटी. शिवाय भाजीची चव, पद्धत सारं वेगळंच. माझ्यासोबत बाकी शिक्षकही जेवायचे. एकदा त्यांचे जेवण माझ्यापेक्षा लवकर आटोपले. ते उठले व म्हणाले, ''सर, शिस्तीत जेवा.'' मला फार राग आला. म्हणजे मी बेशिस्तीत जेवतोय काय ? घरमालकाने 'मुलग्याला' काडेपेटी आणायला सांगायची. मुलगा पळायचा; बाप म्हणायचा, 'अरे शिस्तीत जा !' शिस्तीत म्हणजे सावकाश.

विदर्भाकडे कुणाची ख्याली-खुशाली विचारतात, 'कसं काय चाललंय ?' तो म्हणतो, 'आरामात !' 'आराम' हा हिंदी शब्द, पण वऱ्हाडीत तो बेमालूमपणे वापरला जातो. इकडे विचारल्यास सांगतात, 'काय नाय, निवांत !' इकडे आल्यानंतरच आमच्या वऱ्हाडीत किती हिंदी शब्द रुळले आहेत ते मला कळले. 'छोटा मुलगा' इकडे 'बारकं पोरगं' असतो. 'पागल आहे का ?' असं न विचारता, 'खुळंच हायस्' असं म्हणतात. 'अच्छा' ऐवजी 'असं होयऽ', 'गिलास' ऐवजी 'पेला'. 'साला/साळा' (बायकोचा भाऊ) ऐवजी मेव्हणा. 'त्याच्या मागे फार लागू नकोस' (उसके पिछे मत लगना)ऐवजी 'त्याचा नाद करायचा नाही.' 'थोडे (हिंदी) थांब'ऐवजी 'जरा थांब.' विदर्भात, 'पाहुणा येऊन राह्यला,' 'पाऊस येऊन राह्यला,' अशी संयुक्त क्रियापदे रीती वर्तमान काळासाठी वापरतात; तीही 'आ रहा है' या हिंदीच्या धर्तीवरच.

नव्या घरी राहायला गेलो. शेजारीन म्हणाली, आधी 'लोटून' काढा. मग 'पसारा' लावा. मला कळेना. 'झाडणे' म्हणजे 'लोटणे.' 'सामान' या हिंदी शब्दाऐवजी सुंदर मराठी शब्द 'पसारा.' प्रमाणमराठीतही पसारा म्हणजे अस्ताव्यस्त 'सामान'च. पण इकडे घरातील नीट लावलेल्या वस्तूंना 'पसारा' म्हणतात.

अनेक इंग्रजी शब्दांनाही इकडे मराठी रूपे प्राप्त झाली आहेत. उदा० खाजगी वाहतूक करणाऱ्या ट्रॅक्स-टॅक्सींना म्हणतात 'वडाप.' हा शब्द 'वडापाव'पासून तर आला नसेल ? परवा बसमध्ये सहप्रवाशाची चौकशी केली. तो केशकर्तनालयात नोकरी करणारा. म्हणाला, ''गिऱ्हाइकांची गर्दी रात्री १२पर्यंत चालते. कारण आम्ही प्रत्येकाला वेळ देतो. 'वडाप' करत नाही.'' 'वडाप करणे' हा नवाच वाक्प्रचार. खाजगी वाहनात लोक 'पावात वडा कोंबावा' तसे कोंबतात. सारखी घाई असते. प्रवाशाची काळजी घेत नाहीत. घाईघाईने गोष्ट उरकणे या अर्थी हा वाक्प्रचार आहे तर !

अपडाऊनला 'येऊन-जाऊन'. 'स्क्रू ड्रायव्हर'ला 'मार्तुल' हा सुंदर पर्यायी शब्द. 'पेंचिस'ला 'पकड.' 'कंडक्टर' (इंग्रजी) किंवा 'साहेब' (हिंदी) शब्दांऐवजी बसच्या वाहकाला संबोधतात, 'मास्तर'. हा शब्द, विशेषतः शिकण्यासाठी 'जाऊन-येऊन' करणाऱ्या विद्यार्थ्यांनी रूढ केला. अनोळखी स्त्रीला 'बाई' (हिंदी) ऐवजी म्हणतात, 'मावशी'. 'उभा राहिला', 'उभा राहिलो.' या संयुक्त क्रियापदांऐवजी 'हुबारला', 'हुबारलो', अशी रूपे वापरतात.

गावात नळाला पाणी आठ दिवसांनी येतं. पण 'नळाला' 'चाव्या' म्हणतात. 'चावीपट्टी' म्हणजे नळाचा ग्रामपंचायतीचा टॅक्स - कर. पाण्याच्या टंचाईमुळे आठ दिवसांसाठी दोन प्रकारे पाणी साठवलं जातं : बाहेरच्या हौदात वापरासाठी आणि घरात पिण्यासाठी. या बाहेरच्या वापरायच्या पाण्याबद्दल म्हणतात, 'खर्चाचं पाणी.'

ए-कारान्त क्रियापदांचे सामान्यरूप करताना ए-कारान्तच करतात. महामंडळाच्या नियमानुसार या-कारान्त हवे. मात्र अजूनही 'कळविणेत', 'सांगणेत', 'मागविणेत' अशीच रूपे वापरतात. कन्नडच्या प्रभावाने अप्पासाहेब, अण्णासाहेब ऐवजी अप्पासो, अण्णासो असे लेखन करतात. 'कसबा सांगाव' गावाचे नाव 'क॥ सांगाव' असे लिहितात. काही भाषिक रूपेही कन्नडसारखी आहेत. कर्ता + कर्म + क्रियापद ही रूपे क्रियापद + कर्म + कर्ता अशा उलटक्रमाने - म्हणजे, 'झालं काय जेवण तुमचं ?', 'आल्तं काय मास्तर शाळेत ?' अशी वापरतात. पुढं - समोर (फुडं), उभा (हुबा), चक्की (पिठाची गिरण), कचराकुंडी (कचरा कोंडाळा) ('कुंडी' या कन्नड शब्दाचा अर्थ पार्श्वभाग / नितंब असा होतो) एक इकडे - एक तिकडे (एकटा एकिकडे - एकटा एकिकडे) इकडचा-तिकडचा (अलीकडचा-पलीकडचा), मागे एकदा

(पाठीमागे एकदा), गवत-तण आदी कचरा (काचकट), भाजीपाला (माळवं), ज्वारी (शाळू - शाळुसोबतीमधील 'शाळू' नव्हे !), विनासंकरित (जवार/देशी), साबुदाणा (शाबू) - अशी कंसातली पर्यायी रूपे वापरतात.

अवजारे पाहा : कांदा कापायची विदर्भातील 'पावशी' इकडे 'विळती' होते. माती ओढायचे फावडे = 'खोरे', तण काढायचा विळा = खुरपं. टोपलं अथवा घमेलं = पाटी. लहान टोपलं = बुट्टी. विद्यार्थ्यांना श्रमदानाबद्दल मार्गदर्शन करताना गोंधळ उडायचा - नव्हे 'घोळ व्हायचा.'

'आणखी' या शब्दासाठी इथले लोक पर्याय वापरतात : 'आनी.' 'आनी काय पाहिजे ?' 'मग, कसं काय हो सर आनी ?' विशेष असे की, 'आणि' या उभयान्वयी अव्ययाशी त्याचा अजिबात संबंध नाही. परवा एक शब्द नवाच सापडला : भिजाणे. वाटाणे, शेंगदाणे, बेदाणे सारखा हा प्रकार नाही हं ! बाजारात आमटी-भाजीसाठी मूग, वाटाणा, मटकी, आदी सर्व धान्यांना भिजवून अंकुरवलेले दाणे म्हणजे भिजाणे.

गवत वा कोथिंबीरसारखे तणसदृश्य प्रकार मोजण्याचे एकक पाहा :

| | | |
|---|---|---|
| पाच काड्या | – | एक मूठ |
| पाच मुठी | – | एक पेंडी |
| पाच पेंड्या | – | एक पाचुंदा |
| पाच पाचुंदा | – | एक बिंडा |
| पाच बिंडे | – | एक गंजी |

मूठ ही कापण्याशी-तोडण्याशी संबंधित आहे. पेंडी हाताने उचलता येते. एक पाचुंदा दोन्ही हाताच्या 'कवळ्या'त मावतो. बिंडा दोघा-दोघांनी उचलून गंजी रचली जाते; ती मात्र कोणालाच उचलत नाही.

केवळ भाषाच नव्हे; मी वैदर्भीय असल्याने इकडच्या संस्कृतीचेही मला आश्चर्य वाटले : मुलगी बघायला जाताना केळी नेतात. तिच्या ओटीत घालतात. केळ प्रसवते तेव्हा तिचा आवाजही करकर होतो. म्हणून ती सृजनाचे प्रतीक मानले जाते. लग्नापूर्वीच्या उपवर-उपवधूच्या जेवणाला म्हणूनच 'केळवण' म्हणतात.

विदर्भात बाहेरून कुणी आले की; ते दोघे असोत वा दहा, 'ट्रे'मध्ये तेवढे ग्लास पाणी भरून देतात. इकडे तांब्या-फुलपात्र. भोजन-चहा नंतर इकडे पान-सुपारी देण्याची विदर्भासारखी पद्धत नाही. पान खाणे हा विदर्भात स्वतंत्र वेळ देऊन साजरा करण्याचा कार्यक्रम ! या दोन्ही प्रथांमागे भौगोलिक कारण आहे हे मला नंतर कळले : विदर्भात उष्ण वातावरण आहे. इकडे थंड. त्यामुळे तहान फार लागत नाही. मग ग्लास भरून पाणी कशाला ? एका फुलपात्रात थोडे पाणी घेऊन घशात ओतले की

दिला दुसऱ्याकडे. एकाच तांब्यात दहा जणांची तहान भागते. सुपारीचेही तेच कारण : विदर्भातील उष्ण वातावरण. कष्टकऱ्यांच्या चंचीत - कमरेला सुपारीचे 'खांड' असतेच. तोंडाला कोरड पडली की 'खांड' नाही तर त्याचा 'चिपुरा' (लहान तुकडा) पुरा असतो.

कुत्रं दारात आलं की त्याला हाकलण्यासाठी सर्वजण 'हाड्' म्हणतात. या भागात नवीनच शब्द आहे 'हच' (कानडी शब्द) ! हच-हच करून त्याला हाकलतात. हच (Hutch) ही दूरसंचार कंपनी आहे. आपले नेटवर्क सर्वत्र आहे; ते तुम्ही जाल तिथे सोबत असते, हे सांगण्यासाठी कंपनीच्या जाहिरातीत मात्र कुत्राच वापरला आहे ! त्या दोन्ही 'हच्'चा परस्परांशी काही संबंध आहे ?

इकडे अतिक्रमण करून रस्त्याच्या कडेला वसलेल्या लहान दुकानांना 'खोका' म्हणतात. अशा बसस्थानकाजवळच्या एका चहाच्या खोक्याजवळ चालक-वाहक आले. बस लगेच परत जाणार होती. घाई असेल. चहावाल्याला एकजण म्हणाला, ''तापवलास काय ? नाही ? तापव तारदिशी न् दे झाम्दिशी !''

■

रयत शिक्षण संस्थेचे कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, हुपरी,
जि. कोल्हापूर 416203. भ्रमणध्वनी 9860263163/9764115362

**भाषेचे सपाटीकरण**

आपलं हस्ताक्षर किंवा आपली स्वाक्षरी ही अगदी आपली स्वत:ची अशी ओळख असते. आपलं अक्षर हे फक्त आपलं असतं. दुसरी व्यक्ती कितीही प्रयत्न केली तरी तंतोतंत आपल्यासारखं हस्ताक्षर काढू शकत नाही. आता आय.टी.मध्ये काम करणाऱ्या कोणत्याही व्यक्तीला जाऊन विचारा, की हातामध्ये पेन घेऊन कागदावर स्वत:च्या अक्षरात लिहून त्यांना किती वर्षं झाली ? आज मला स्वत:लासुद्धा स्वत:चं अक्षर ओळखता येत नाही. कारण माझं अक्षर मला फक्त Arial, Tahoma, Times New Roman, मध्येच बघायची सवय झाली आहे. आणि मग Arial, Tahoma, Times New Roman तर जगातल्या कोणाही व्यक्तीकडे असतात. सपाटीकरणाची ही अगदी अगदी मूलभूत अशी सुरवातच नाही का ?

- सुचेता कडेठाणकर, 'साप्ताहिक सकाळ', ८.०३.२००८

# प्राण्यांच्या भाषेत माणसांनी ओतलेला ''प्राण''

केशव सखाराम देशमुख

भाषा पूर्णत: मानवी आहे. ती ईश्वरदत्त नाही. निकडपरत्वे भाषेचा विचार आणि विकास माणसाने केला आहे. प्राण्यांबद्दल माणसाने भाषेत खास अशी शब्दकळा उपयोजिलेली दिसते. प्रादेशिक पातळीवर या प्राण्यांच्या भाषेविषयीची संदर्भसंपन्नता अथवा अर्थसंपृक्तता वेगवेगळी आहे. त्यातही विशेषकरून 'शेती' आणि 'घर' ही दोन महत्त्वपूर्ण स्थळे; ज्या स्थळांचा विचार केला तर ग्रामीण भागात शेती आणि घर या दोन विस्तीर्ण स्थळांशी बद्ध असणारे जे म्हणून प्राण्यांचे- मूलत: पाळीव प्राण्यांचे-जग आहे त्या एकूण जगाबद्दल माणसाने स्वतंत्र शब्दकळांचा 'भाषावर्ग'च निर्मिलेला आहे. या संदर्भात, पाळीव प्राण्यांकरिता उपयोगात आणल्या जाणाऱ्या मानवी भाषेतील शब्दकळा कुठल्या उद्देशाने वापरात आणली जाते, याचा तपशील पुढील तालिकेत नोंदविता येईल :

| अनुक्रम | प्राणिनाम | उद्देश | उपयोजिला जाणारा शब्द |
|---|---|---|---|
| १ | बैल, गाय | १. पाय वर कर असे सांगताना | 'उच' |
| | | २. हाकारताना | 'हाट...हाट...' किंवा 'दी', 'दिऱ्हो दिऱ्हो' |
| | | ३. पाणी पाजताना | 'शीळ.' |
| २ | मांजर, बोका | १. बोलावताना | 'ये शीबी शीबी...' |
| | | २. हाकलून लावताना | 'सूक सूक सूक...' |
| ३ | कोंबडा, कोंबडी | १. बोलावताना | 'आ तीतीतीती आ...' |
| ४ | शेळी, बोकड | १. हाकलताना | 'थीर थीर...' |
| ५ | कुत्रा, कुत्री· | १. बोलावताना | यू यू यू यू |
| | | २. हाकलताना | हा ऽऽऽ ड... |

या तालिकेतील प्राण्यांसाठी उच्चारली जाणारी शब्दकळा ही पुनरुक्तिवाचक आहे; तिच्यात आंतर्बाह्य गोडवाही आहे. नादानुकूलता आणि गतिप्रधानता हे दोन ठळक विशेष या प्राण्यांसाठी उपयोजिल्या जाणाऱ्या शब्दांत आढळून येतात.

(१) प्राण्यांसाठी त्यांना कृती करावयास लावताना अथवा त्यांना बोलावताना किंवा हाकलताना संबोधनांचा वापर, शब्दकळेची ढब लक्षणीय असल्याचे वर दर्शवलेल्या तालिकेवरून कळून येते. मानवी असलेल्या 'माणसांच्या' भाषेत पुरुषवाचक आणि स्त्री-वाचक भाषावापरात निराळेपण आहे. तथापि, प्राणिवाचक भाषा-वापरात मात्र 'लिंगनिष्ठ' बदल जाणवत नाही. प्राणिवाचक भाषेचा हा मोठा विशेष नोंदवता येईल.

(२) गाय-बैल चारापाण्याच्या जवळच बांधावयाची झाली म्हणजे त्यासाठी 'आखडून' हा शब्द उपयोजिला जातो. गवताच्या प्रदेशात चारा खाण्यासाठी लांब दोरीने बैल बांधलेले असतात. त्या दोरीला 'सरका' असा शब्द वापरतात.

(३) शेळीला स्त्रीलिंगी पिल्लू जेव्हा जन्मते त्या पिलाला 'पाठ' असे संबोधतात. याप्रमाणे : म्हशीला 'डोबाड' तर म्हैशाला 'हालगट' अशा प्रकारचा शब्द समाजभाषेत प्रभाव प्रस्थापित करून आहे. मोकाट, बिनकामाच्या बैलाला : 'कठाळ्या' आणि 'नंदीबैल' असे ठेवणीतले दोन शब्द असून सुसाट, मोकाट पळणाऱ्या बैलासाठी 'वाफडणे' असे क्रियापद उपयोगात आणतात, तर पळवण्यात येणाऱ्या बैलांसाठी 'खेदाडणे' हे क्रियापद.

(४) रात्री, बेरात्री शेळीची पिल्ले ज्याच्याखाली सांभाळून झाकून ठेवली जातात त्याला 'डालगे' म्हटलेले आहे. बैल-गायी-म्हशी यांच्या निवासस्थळाला 'कोठा' असे संबोधण्यात येते, तर ''खुराड्या''त कोंबड्या 'कोंडून' ठेवण्यात येतात. म्हाताऱ्या बैलास 'डंगर' म्हणतात. देवास सोडून दिलेल्या गायीला 'जानी' आणि बैलास 'कठाळ्या' असे दोन मंगलप्रणित शब्द उपयोजिले जातात.

(५) बैलांनी कुठेही तोंड घालून 'वाट्टेल' तेवढे खात सुटू नये यासाठी बैलांच्या तोंडांना 'मुचके' बांधण्यात येते. बैलांना आवर घालण्यासाठी 'एसन' घालण्यात येते.

(६) म्हैस, रेडा यांच्या अंगावरील केस काढण्याच्या क्रियेला 'भादरणे' एवढेच क्रियापद भाषेत आढळते.

(७) गायी 'दावणी'ला बांधल्या जातात, तर बैल 'गव्हाणी'त चारा खातात. 'गव्हाण' हे बैलांचे सामूहिक स्वरूपाचे 'जेवणाचे ताटच !'

(८) जनावरांच्या गर्भधारणा प्रक्रियेला 'फळवणे' हे क्रियापद उपयोगात आणतात.

(९) गायींना  नाकांमधून  'एसन' घातली जात नाही. तिच्या पावित्र्याचा विचार समाजमनात रुजून असल्याकारणाने गायींनी अधिकच इकडेतिकडे पळू नये म्हणून त्यांच्या समोरच्या दोन पायांमधून-गळ्यांमधून एक ''लांब लाकूड'' बांधले जाते. त्या लाकडास ''लोढणे'' असे नाव दिले गेले आहे. शेळी, घोडा, घोडी यांच्या धावपळीवर प्रतिबंध घालण्यासाठी ''मागच्या-पुढच्या'' अशा दोन पायांना एकेरी दोरखंड बांधला जातो, त्यास 'पायखुटी' म्हटले जाते.

ही अशी समाजातून 'मानवी' अशा स्वरूपाची भाषेमधील प्राण्यांसाठी जन्म पावलेली खास शब्दकळा ! वरील शब्दसंपत्तीमधील अनेक शब्द गंमत आणि गांभीर्याने माणसांनाही उद्देशून वापरण्यात येतात. केव्हा ? जेव्हा माणसातले ''ढोर'' जागे होते तेव्हा !

■

मराठी विभाग, श्रीमती दानकुंवर महिला महाविद्यालय, जालना.

**भाषेचे सपाटीकरण**

आय.टी. क्षेत्रामध्ये मी टेक्निकल रायटर म्हणून काम करते. लिखाणाची आवड या एका प्रेरणेने या क्षेत्रामध्ये गेले तेव्हा मला स्वप्नातही असं वाटलं नव्हतं, की आपल्याकडे असलेली शब्दसमृद्धी हा टेक्निकल रायटर म्हणून काम करताना गुण म्हणून गणला जाणार नाही. एखादी गोष्ट युझरला समजावून सांगताना निरनिराळे शब्द वापरणं हे कसं अयोग्य आहे, हेच मला शिकवलं गेलं. आणि याचं कारण असं, की ज्या एका सॉफ्टवेअरबद्दल मी लिहिते आहे, त्याच्या इतर काही पैलूंबद्दल इतर अनेक लेखक आमच्या वेगवेगळ्या ऑफिसेसमध्ये लिहीत असतील, त्या प्रत्येकाने आपापल्या शब्दबळानुसार एकाच गोष्टीचं वर्णन करायला निरनिराळे शब्द वापरले, तर त्या लिखाणाचं भाषांतर करताना मशिन गोंधळून जाईल. (हो, बरोबर ! मशिनच म्हणते आहे मी. कारण आमच्याकडे पहिलं भाषांतर मशिन करतं आणि मग ते बरोबर आहे की नाही, हे एखादा भाषातज्ज्ञ तपासतो.) तर त्या मशिनचा गोंधळ होऊ नये म्हणून आम्ही केवळ आमच्या डिक्शनरीमध्ये दिलेलेच शब्द वापरून जे लिहायचं ते लिहितो.

- सुचेता कडेठाणकर, 'साप्ताहिक सकाळ', ८.०३.२००८

# १ : चेकचा घोटाळा !

**विजय पाध्ये**

अनुवाद करून देण्याचे काम जसे मी आता व्यावसायिक अनुवादक म्हणून करतो, तसे अधूनमधून दुसऱ्या कुणीतरी करून दिलेला अनुवाद तपासून देण्याचे, त्यावर अभिप्राय देण्याचे व मूल्यमापन करून देण्याचेही काम करतो. असे मूल्यमापन करून सुधारणा करून देण्यासाठी अलीकडे आलेला एक दस्तावेज अल्झायमर्स व्याधीसंबंधी रुग्णाची माहिती गोळा करण्यासंबंधीचा होता.

अल्झायमर्ससंबंधीची आता बहुतेकांना बऱ्यापैकी माहिती असावी. अशा रुग्णाची मानसिक, वैचारिक क्षमता क्षीण झालेली असते, त्याला आपण स्वतः नुकतीच केलेली, अगदी नेहमी करीत असलेली कृतीही आठवत नाही. जेवण घेऊन झालेले असले तरीही ''मला तुम्ही जेवायला का घालत नाही ?'' अशी कुटुंबियांजवळ रुग्ण तक्रार करतो. टीव्ही पाहात बसलेला असला तरी आपण काय पाहात आहो ह्याचे त्याला भानच नसते ! (अल्झायमर्ससंबंधीच्या अधिक माहितीसाठी जिज्ञासूंनी शोभा चित्रे ह्यांचे 'पानगळीच्या आठवणी' वाचावे.)

अशा रुग्णाची स्मरणशक्ती किती प्रमाणात टिकून आहे हे पाहण्यासाठी मराठीत अनुवाद करून आलेला तो एक चाचणीचा कागद होता. रुग्णाजवळ थोडे पैसे, चेकबुक व पिशवी दिली आणि काय काय वस्तू बाजारातून आणायच्या आहेत त्यांची यादी दिली, तर तो ख़रेदीचा व्यवहार किती प्रमाणात बरोबर करतो ते त्या प्रश्नांतून पाहायचे होते. ज्या कुणी हे अनुवादाचे काम केले त्याने तपासणी-पुस्तकाचा उल्लेख केलेला पाहून मी गोंधळून गेलो. ह्या व्यवहारात तपासणीचा संबंधच काय आहे ते कळेना. इंग्लिशमधील मूळ मजकूर पाहिल्यावर हा गोंधळ दूर झाला. गोंधळ कुणाकुणाचा झाला अन तो कुणी केला असावा बरे ?

पहिला अपराध अमेरिकेने केला होता; कारण त्यांनी चेक ह्या शब्दाचे स्पेलिंग 'तपासणी'साठी वापरल्या जाणाऱ्या शब्दाचे करतात ते 'check' केले होते. दुसरा अपराध अनुवादकाचा, कारण त्याने त्या शब्दाच्या अलीकडे-पलीकडे असलेली शब्दयोजना, प्रश्नात योजलेला प्रसंग, एकूण चाचणीचा विषय, त्याच्याशी संबंधित

असणारी व्यक्ती ह्यांना जमेस धरलेलेच नव्हते. पैसे, पिशवी, खरेदी करण्याच्या वस्तूंची यादी वगैरेच्या मांदियाळीत हे 'तपासणी-पुस्तक' वाट चुकून कसे येईल ह्याचा जरादेखील विचार केला नाही अन मराठी रूप ठोकून दिले ! हे अनुवादाचे काम पूर्ण होऊन अनेक पातळ्यांवर आधी तपासले गेले आहे असे मला सुरुवातीसच सांगितले गेले होते. (सुरुवातीस एक सामान्य अनुवादक, त्यानंतर वरिष्ठ अनुवादक, त्यानंतर त्या व्याधींवर उपचार करणारे असे तज्ज्ञ, की ज्यांच्याकडून भाषेसंबंधी गौण दृष्टीने परंतु व्याधीसंबंधी विशेष बारकाईने तो अनुवाद पाहण्याची जबाबदारी असते, ते व त्यानंतर व्याकरण-शुद्धलेखन ह्यांची चांगली माहिती असणारा ज्येष्ठ अनुवादक अशी ही उतरंड असते, असे दस्तावेज माणसाच्या दैनंदिन जीवनाशी निगडित असल्याने त्यासाठीची प्रक्रिया इतकी चोखंदळपणे योजलेली असते.) म्हणजे किती जणांनी ह्या 'चेक'च्या घोटाळ्याकडे दुर्लक्ष केले होते त्याची कल्पना येऊ शकेल !

## २ : मराठी दूरध्वनी निर्देशिका : भाषेची दुर्दशा !

दोनतीन वर्षांपूर्वी मला प्रत्यक्ष अनुभवायला असा एक प्रसंग आला तो इथे सांगावासा वाटतो, कारण त्यामधून आपल्याला सध्याच्या परिस्थितीचे वस्तुनिष्ठ दर्शन घडणार आहे.

मी एक व्यावसायिक अनुवादक म्हणून काम करतो. एका प्रथितयश मोबाईल फोनच्या निर्मात्याकडून आलेले काही अनुवाद प्रकल्पांचे काम बव्हंशी संपत आले होते व त्यांच्या चाचण्यांचे काम चालू झाले होते. मला अशी विनंती करण्यात आली की आपल्याला स्थानिक दूरध्वनी पुरवणाऱ्या कंपनीने दूरध्वनी-निर्देशिका मराठीतून प्रसिद्ध केलेली असेल तर तिची एक प्रत त्या मोबाईल कंपनीकडे पाठवून देण्याची व्यवस्था करावी. भारत संचार निगम लिमिटेडने अशी दूरध्वनी-निर्देशिका मराठीतून प्रसिद्ध केली होतीच, म्हणून ती दोन भागांतील वजनदार निर्देशिका मी ताबडतोब खरेदी करून तिकडे (परदेशात) पाठवून दिली. काही दिवसांनी मला त्या मोबाईल कंपनीच्या युरोपमधील संशोधन व विकसन केंद्रास प्रत्यक्ष भेट देऊन चाचणीच्या कामात सहभागी होण्यासाठी निमंत्रण आले. ही निर्देशिका त्या कंपनीला कशासाठी हवी आहे, तिचा मोबाईल फोनशी काय संबंध असेल ह्याची त्यांनी मला कल्पना दिली नव्हती वा मीही आपणहून त्याबद्दल ना विचारपूस केली, ना ती चाळून पाहिली. कधीतरी बघायला लागणारी इंग्लिशमधील निर्देशिका आपल्या घरी होतीच. मराठीतील निर्देशिका काय वेगळी असणार अशी माझी भूमिका !

मग मला अनेक कामांबरोबर एक काम देण्यात आले. नव्वद-एक नावांची सूची

एकाखाली एक अशा पद्धतीने मराठीत तयार करून दिली गेली व ती नावे आणि त्यांचा वर्णानुक्रम माझ्या मते बरोबर आहे ना, ह्याची खात्री करून देण्यास सांगितले गेले. मी सूची नजरेखालून घालायला सुरुवात केली अन लगेच आपले मत त्या अधिकाऱ्यांना देऊन मोकळा झालो, की हा वर्णानुक्रम चुकीचा आहे ! अँग्ला-उर्दू स्कूल सर्वप्रथम, व त्यानंतर अकबर, मग आयडीबीआय बँक, मग आयसीआयसीआय बँक अशा प्रकारे लावलेला सूचिक्रम मराठी वर्णमालेस अनुसरून नाही असे मी त्यांना सांगितले. त्याबरोबर, मीच त्यांना पाठवलेली दूरध्वनी निर्देशिका त्यांनी माझ्या पुढ्यात टाकून सांगितले, की मला तपासण्यासाठी दिलेली सूची त्या निर्देशिकेतूनच घेतलेली होती व त्यावर प्रक्रिया करून झाल्यावर ती नावे व वर्णानुक्रम जसाच्या तसा आहे की नाही त्याची खात्री करण्यासाठी मला सांगितले होते. मग मी निर्देशिकेतील ती नावे व वर्णानुक्रम, त्यांनी दिलेल्या सूचीशी ताडून पाहिला व तो अचूक असल्याचे मान्य केले अन आधी दिलेले मत मागे घेऊन आपल्याला व भारत संचार निगम-लिमिटेड ह्यांना क्षमा करावी अशी विनंती केली. ही अवघड परिस्थिती का बरे निर्माण झाली असावी ?

कारण भारत संचार निगमने ज्या कोणाकडून हे निर्देशिकेचे काम करून घेतले त्याने वापरलेल्या सी-डॅकच्या संगणक प्रणालीमध्ये तोच वर्णानुक्रम दिला होता व डीटीपीचे व तपासणीचे काम निरनिराळ्या व्यक्तींनी केलेले असल्यामुळे (व त्यातील काही व्यक्ती अमराठी असल्यामुळेच), जिला एखाद्या नावाचा जो उच्चार योग्य वाटत होता त्याप्रमाणे त्याची अक्षररचना नोंदली गेली होती. ह्या संगणक प्रणालीमध्ये जर वर्णक्रम चंद्रबिंदूने सुरू होत असेल व त्यानंतर स्वरमाला येत असेल तर 'अँग्लोउर्दू स्कूल'ची नोंद सर्वप्रथम होऊन मग 'अकबर' येणार हे अपरिहार्य आहे. त्याचप्रमाणे, 'आयडीबीआय बँक' ह्याची अक्षररचना करणारा डीटीपीकार (अमराठी व विशेष करून हिंदीभाषक असल्यामुळेच - कारण हिंदीभाषकच लोक अशा प्रकारचे उच्चार करतात) त्या नावाचा उच्चार 'आइडीबीआइ बँक' असा करीत असेल आणि आयसीआयसीआय बँक ह्याची अक्षररचना करणारा मराठी भाषक उच्चार करतात त्याप्रमाणे आयसीआयसीआय बँक असा करीत असेल, तर अक्षररचना त्या वर्णानुक्रमानेच होणार ! (कदाचित असेही असू शकेल, की एकच निर्देशिका सुरुवातीची काही व वेष्टनाची पाने वेगळी छापून हिंदी संस्करण व मराठी संस्करण अशी केवळ नावे देऊन दोन्ही भाषकांचा दुवा घेण्याचा प्रयत्न केला गेला !) ■

4, चित्रा 'बी', विद्यासागर सोसायटी, महेश सोसायटी परिसर, बिबवेवाडी, पुणे 37.
दूरभाष : (020) 24211951. ई-मेल : v.padhye@gmail.com

# मिताक्षरी भाषा

[हे टिपण १९०६ या वर्षाच्या फेब्रुवारी महिन्यात प्रसिद्ध झालेल्या 'केरळकोकिळा'त (पुस्तक क्रमांक २०, अंकांक २, पृष्ठांक ४२-४५ व ४८, प्रकाशक : श्रीपुत जनार्दन महादेव गुर्जर, मुद्रण स्थळ : जावजी दादाजींचे निर्णय सागर मुद्रणालय, मुंबई) आढळते.]

जगांतील कोणतीही भाषा घेतली तरी, तींत बोलतांना परक्या भाषेंतील बाकी सारे शब्द बदलतात, पण रामा, जनू, महंमद, जानसन, रंगय्या, शालेमन अशी जीं विशेषनामें असतात, तीं कधींही बदलत नाहींत. ह्यामुळें एखाद्या मनुष्यादेखत दुसऱ्या भाषेंत कांहीं गुप्त मजकूर बोलावयाचा असला, आणि त्यांत त्या विवक्षित मनुष्याचें नांव घेण्याचा प्रसंग आला तर, मोठीच अडचण पडते. आणि निदान पर्यायानें तरी बोलावें लागतें.

ही अडचण इंग्रजी भाषेंत थोडीशी दूर होण्यासारखी असते. कारण, इंग्रजी भाषेंतील वर्णरचना अगदीं भिन्न तऱ्हेची असते. ह्यामुळें ही गोष्ट साधते. उदाहरण, नारायण असें ह्मणावयाचे तर त्या शब्दाचें स्पेल - एन्,ए,आर्,ए,वाय्,ए,एन्, - अशीं अक्षरे उच्चारलीं तर काम होतें. कारण, ह्या अक्षरांच्या उच्चारांवरून इंग्रजी भाषानभिज्ञांस मूळ नांवाचा बोध होणें फारसें शक्य नाही.

पण इतर भाषेंत मूळाक्षरें बहुधा आपल्याच सारखीं असल्यामुळें तसेंही करता येत नाही. पण **मिताक्षरी** भाषेंत ही नड राहत नाहीं. पाहिजे ती विशेष नामें असोत, ती उच्चारलीं असतां ती भाषानभिज्ञाला त्यांतील काहींएक मागमोस लागावयाचा नाहीं. ह्याचें कारण, ''मिताक्षरी'' ह्मणून काहीं निराळी भाषा नाहीं. तर वर्णोच्चारांची पालट करणें ह्यालाच **मिताक्षरी** असें ह्मणतात. ह्या भाषेमध्ये फक्त अमुक वर्णाच्या ठिकाणीं अमुक वर्ण योजावयाचा - वेलांट्या, काना, मात्रा वगैरे स्वर तसेच ठेवायचें - असे ठरविलेलें आहे. ह्यामुळें पाहिजे त्या भाषेची **मिताक्षरी** करतां येते. शब्दांतील अक्षरें पालटून व मागें एक 'अ' किंवा 'चि' लावून लहान मुलेंही एक मजेची भाषा बोलत असतात. 'तूं तिकडे कशाला गेला होतास.' हें वाक्य बोलावयाचें तर मुले - 'अतू

अकडे ती अशालाक अला होतास गे.' असें बोलतात.

अशाच मजेच्या भाषेपैकीं मिताक्षरी ही एक उच्च प्रतीची भाषा आहे. ह्या भाषेंतील वर्णांची अदलाबदल कशी करावी, ह्याबद्दल एक संस्कृत श्लोक आहे तो असा :

अकौ खगौ घङश्चैव चटौ तपौ परस्परं ।

यशौ रषौ लसश्चैव हवाळाक्षमिताक्षरी ॥

ह्याचा अर्थ : - 'अ'च्या ठिकाणीं 'क', व 'क'च्या ठिकाणीं 'अ'; 'ख'च्या ठिकाणीं 'ग', व 'ग'च्या ठिकाणीं 'ख', 'घ'च्या ठिकाणीं 'ङ' व 'ङ'च्या ठिकाणीं 'घ.' तसेंच 'च' वर्गाच्या ठिकाणीं 'ट' वर्ग; व 'ट' वर्गाच्या ठिकाणीं 'त' वर्ग. 'त' वर्गाच्या ऐवजीं 'प' वर्ग व 'प' वर्गाच्या ऐवजीं 'त' वर्ग. 'य'च्या ठिकाणीं 'श', व 'श'च्या ठिकाणीं 'य'; 'र'च्या ठिकाणीं 'ष', व 'ष'च्या ठिकाणीं 'र'; 'ल'च्या ठिकाणीं 'स' व 'स'च्या ठिकाणीं 'ल'. 'ह'च्या ठिकाणीं 'व' आणि 'व'च्या ठिकाणीं 'ह'. 'ळ'च्या ठिकाणीं 'क्ष' व 'क्ष'च्या ठिकाणीं 'ळ'.

ह्या नियमाप्रमाणें सर्व वर्गांची अदलाबदल येणेंप्रमाणें होते :

| | | | | |
|---|---|---|---|---|
| क = अ, | च = ट, | ञ = ण, | ध = भ, | ल = स |
| ख = ग, | छ = ठ, | त = प, | न = म, | व = ह |
| घ = ङ, | ज = ड, | थ = फ | य = स, | ळ = क्ष |
| | झ = ढ, | द = व, | र = प | |

ह्या नियमाप्रमाणें मिताक्षरी भाषेनें बोलावयाचें तर मामाला नाना ह्मणावयाचें व नानाला मामा ह्मणावयाचें. कारण, 'न'च्या ठिकाणीं 'म' व 'म'च्या ठिकाणीं 'न' अशी अक्षरांची बदल आहे. ह्या बदलीप्रमाणें ह्या भाषेंत कित्येक रूपें फार मजेदार होतात. जसें :

'कांद्या'ला 'आंबा', व 'आंब्या'ला कांदा. 'दादा'ला 'बाबा', व 'बाबा'ला 'दादा'. 'पापा'ला 'ताता'; व 'ताता'ला 'पापा'. 'आई'ला 'काकी' व 'काकी'ला 'आई'. 'नारायण', 'गोविंदा' ह्मणावयाचें झालें तर 'माषाषञ' व 'खोहिंबा' असें ह्मणावयाचें.

'तुह्मी कोणीकडे जातां ?' हे वाक्य बोलावयाचें तर 'पुन्वी ओञीअडे डापां ?'' असे ह्मणावयाचें.

'मला काल ताप आला होता' हे ह्मणावयाचें तर 'नसा आस पात कासा वोपा' असें ह्मणावयाचें.

अशा रीतीनें पाहिजे तीं वाक्यें, पत्रें व कविता सुद्धा बदलतां येतात :

आसही तुझी फार लागली ।

दे दयानिधे बुद्धि चांगली ॥
देउं तूं नको दुष्ट वासना ।
तूंच आवरी माझिया मना ॥ १ ॥

हा श्लोक मिताक्षरींत येणेंप्रमाणें होईल : -

कालवी पुढी थाष साखसी ।
बे बशामिभे दुभ्भि टांखसी ॥
वेकु पू मओ बुर्च हालमा ।
पूट काहपी नाढिशा नमा ॥१॥

ह्यांत 'ङ' व 'ञ्' हे दोन वर्ण आपल्या भाषेंत कधींही न येणारे; व त्यांचा उच्चार संयुक्त अक्षराशीं करतां येणें जड जात असल्यामुळें वर्ज्य केले असते, तर ही भाषा अधिक सुगम झाली असती. मिताक्षरी ही एक प्रकारची मुलांना ह्मणा, किंवा फावल्या वेळीं पोरांना ह्मणा करमणूक आहे. तेव्हां तीही ध्यानांत असावी.
[टीप : या टिपणातील शुद्धलेखन मुळाबरहुकुम]

■

प्रेषक : सु.म. तडकोडकर, प्रपाठक, मराठी विभाग, गोवा विद्यापीठ, गोवा 403206.

## भाषेचे सपाटीकरण

एडवर्ड हॉल नावाच्या एका मानववंशशास्त्रज्ञाने सर्वप्रथम 'संदर्भ-समृद्धता' या विषयावर त्याच्या The Silent Language and The Hidden Dimension या पुस्तकामध्ये लिहिलं आहे. त्याच्या मते, कोणताही समाज हा 'उच्च संदर्भ-समृद्ध' किंवा 'नीच संदर्भ-समृद्ध' असू शकतो. ही संदर्भ समृद्धता येते वेगळेपणामधून. अशा समृद्ध समाजामध्ये, भाषेमधून व्यक्त होणारा अर्थ हा केवळ उच्चारांमधून आलेला नसतो. त्याला बराच मोठा संदर्भ असतो आणि तो संदर्भ समजल्याखेरीज ती भाषा किंवा तो शब्दही समजून घेणं शक्य नसतं. एडवर्डच्या या संकल्पनेच्या आधारे म्हणायचं, तर भारतीय समाज हा संदर्भ-समृद्ध होता. सपाटीकरणाच्या या प्रक्रियेमुळे आपण या संदर्भ-समृद्धतेपासून दूर तर जात नाही ?

■

- सुचेता कडेठाणकर, 'साप्ताहिक सकाळ', ८.०३.२००८

**दखलयोग्य-१**

# मराठी भाषा सौजन्यपूर्ण आहे का ?

**अच्युत ओक**

मराठी भाषा सौजन्यपूर्ण आहे का ?

मला हा प्रश्न गेली बरेच वर्षे पडला आहे. महाविद्यालयात प्राचार्य म्हणून पंधरा-सोळा वर्षे; शिवाय 'इन्स्टिट्यूट ऑफ मॅनेजमेंट'चा संचालक म्हणून काम करताना विद्यार्थी, पालक यांच्याशी संपर्क वारंवार येत होता. या अनुभवाने मला पडलेल्या प्रश्नाचे उत्तर तर मिळालेच नाही; पण प्रश्न जास्त कुटिल होत गेला.

भाषेची ओळख, उच्चार, अर्थ आणि संवाद यात बालकाची पहिली पाच ते सात वर्षे जातात. त्या वेळी शब्दसंग्रह झालेला असतो, व्याकरणाची ओळख असते, शब्दांचा अर्थ आणि वाक्यरचना पण येत असते. बालवाडीची दोन वर्षे, मग पहिली आणि दुसरी अशा चार वर्षांत, म्हणजेच तीन ते सात वर्षे या वयोगटात मुलाची भाषिक वाढ खूप झालेली असते. बालवाडीला शासनमान्य अभ्यासक्रम किंवा पुस्तक नाही. पहिली आणि दुसरीला शासनमान्य अभ्यासक्रम आणि बालभारतीची क्रमिक पुस्तके आहेत.

मराठी आणि इंग्रजीतील या चार वर्षांची 'बालवाडी' आणि 'बालवाडी २' ही पुस्तके आणि पहिली आणि दुसरीची क्रमिक (बालभारती) पुस्तके वाचून, अभ्यासून बघितली. मराठी आणि इंग्रजी माध्यमांच्या पूर्वप्राथमिक व प्राथमिक शाळांना, शिक्षकांना भेट देऊन पुस्तके जमा केली आणि त्यांचे अनुभव ऐकले.

आता तुलनात्मक केलेला अभ्यास पाहा.

मराठीतील दुसरीपर्यंतच्या पुस्तकांतून तयार तक्त्यातून कोठेही 'कृपया', 'स्वागत', 'आभार', 'क्षमा करा', 'देशील का', 'वाटशील का', 'माफ करा', 'आभारी आहे', 'आपण', 'चूक झाली', 'तुम्हाला / आपणाला भेटून आनंद झाला', 'माझ्यावर, / आमच्यावर उपकार झाले', 'तुम्ही / आपण घरी आल्याने आनंद झाला', 'शुभेच्छा', 'मी आनंदाने काम करेन', 'आपल्या सहकार्याने आमचे काम सोपे झाले', 'अभिनंदन' असे आणि अशांसारखे दुसऱ्यांविषयी आदर दाखविणारे, स्वत:ची चूक अथवा आनंद व्यक्त करणारे, दुसऱ्याच्या आनंदात, दु:खात

सहभाग दाखविणारे शब्दही नाहीत आणि वाक्ये तर नाहीतच नाहीत. ज्या वयात बालकाला हे शब्द आणि वाक्येही अर्थासह शिकवायला हवीत, ती तर अभ्यासक्रमातच नाहीत. या शब्दांचे ज्ञान, अर्थ, उपयोग आणि जाणीव मुलाला कधीतरी नंतर येते. जाणीव झालीच तर ते शब्द, वाक्ये अभावानेच त्याच्या संग्रहात टिकतात. व्यवहारात हे शब्द आणि वाक्ये यांचा उपयोग केवळ 'नाटका'करिता राखून ठेवला आहे.

याउलट इंग्रजी माध्यमाची ज्युनिअर, सीनियर के.जी. आणि पहिली व दुसरीचा अभ्यासक्रम बघा. सुरवातीपासूनच '''थँक्स', 'प्लीज् ! मे आय कम् इन ?', 'वेल्कम', 'एक्स्यूज् मी', 'पार्डन मी', 'आय ॲम सॉरी', 'आय् ॲम ग्लॅड', 'ओब्लाइज्ड्', 'काँग्रॅच्युलेशन्स', 'हॅपी बर्थडे', 'गुड विशेस टु यू', 'गुड लक्''' असे शब्द आणि वाक्यप्रयोग आढळतात. विद्यार्थी आणि शिक्षक त्याचा वापर करताना दिसतात. विद्यार्थी आई-वडिलांना ''प्लीज्, हे घ्या ना !', असे संबोधताना आढळतात. त्यांचे पालकही, ''प्लीज्, डू धिस'' असे बोलताना आढळतात.

मराठी अभ्यासक्रमात सर्व गोष्टी आज्ञार्थी ! 'हे कर', 'ते करू नकोस', 'वेळेवर जा', 'कपडे नीट घाल', 'केस विंचर', 'आंघोळ कर', अशा आज्ञाच जास्त. भाषेत कोठेही समोरच्या व्यक्तीविषयी आदर ठेवून बोलायला शिकवतच नाहीत. संस्कारक्षम वयात या जाणिवा, उणिवा दाखवून दिल्या नाहीत तर त्या फक्त नंतरच्या जीवनात नागरिकाला अनुभवाने किंवा सक्तीने करायला लागतात. हे काम केले नाही तर भाषा सौजन्यपूर्ण होणार नाही व विद्यार्थ्यांच्या वागण्यातही ते दिसणार नाही. ■

सकाळ, १९-१२-२००७

**भाषा व समाज**

भाषा व समाज यांचे नाते असे आहे. ते दोघेही एकमेकांशिवाय अस्तित्वहीन असतात व म्हणूनच ते एकमेकांवर अवलंबून असतात. भाषा जर आत्मा असेल, तर समाज हे त्याचे शरीर आहे. शरीरात जर आत्मा नसेल, तर शरीर अचेतन होते, त्याला 'प्रेत' म्हणतात. आणि आत्म्याला राहण्यासाठी शरीर नसेल, तर त्याला 'भूत' म्हणतात. म्हणूनच मराठी भाषा जगवायची व वाढवायची, तर त्यासाठी तितकाच समर्थ मराठी समाज निर्माण करणे गरजेचे आहे. अमराठी लोकांना मराठी भाषा शिकवून वा मराठीची राज्यात सक्ती करून मराठी समाज समर्थ कसा होणार ?

- भारतकुमार राऊत, महाराष्ट्र टाइम्स, १६ मार्च २००८

# मराठीच्या शिक्षकांची तज्ज्ञांच्या मदतीची गरज कशी भागवणार ?

नंदिनी अविनाश बर्वे

मी एक निवृत्त शिक्षिका आहे. मी तीस वर्षे मराठी व इतिहास या विषयांचे अध्यापन केले. या काळात, मी ८वी, ९वी, १०वी या इयत्तांची प्रत्येकी चार पाठ्यपुस्तके शिकवली. या काळामध्ये अध्यापन करताना मनात आलेल्या काही शंकांचे निरसन झाले, काही अजूनही अनुत्तरित आहेत. इयत्ता ९वी मराठीचे नवे पाठ्यपुस्तक आले आणि वाचताना काही शंका निर्माण झाल्या. तसेच यावर्षी इयत्ता १०वीचे नवे पाठ्यपुस्तक आले आहे. त्यातही काही शंका आहेत.

माझ्यासारखे असे कितीतरी शिक्षक असतील, की ज्यांना वारंवार शंका येतात. 'मला केशरी पेढे आवडतात' या वाक्यातील 'मला'ची विभक्ती चतुर्थी व कारकार्थ संप्रदान व क्रियापद अकर्मक असे स्पष्टीकरण मृदुला गडनीस (कर्जत) व डॉ. आर.एन. कुलकर्णी (निपाणी) यांनी दिले. डॉ. कुलकर्णी पुढे लिहितात, की मराठी व्याकरणाचे पुष्कळसे नियम संस्कृत व्याकरणावर आधारित आहेत. 'आवडणे' धातू अकर्मक आहे; पण गंमत म्हणजे इंग्रजीमध्ये आवडणे 'लाइक' क्रियापद सकर्मक आहे. त्यामुळे मराठीत 'मला पेढा आवडतो' आणि इंग्रजीतील 'आय लाइक पेढा' या वाक्यांचे व्याकरण एकदम भिन्न आहे. कर्ता कर्म ओळखण्यासाठी कुलकर्णी यांनी मो.रा.वाळंबे यांच्या पुस्तकाचा संदर्भ दिला.

खेड्यापाड्यांत असे असंख्य शिक्षक असतील, की ज्यांना योग्य मार्गदर्शक अथवा संदर्भपुस्तकेही मिळत नाहीत. इतर काहीजण साशंकच. अनेकांची मते परस्परविरुद्ध. याचा अर्थच असा, की आम्हां शिक्षकांची ही गरजच आहे. अधूनमधून या विषयातील काही अधिकारी लोकांबरोबर चर्चा, विचारविनिमय, शंकासमाधान करण्याची संधी आम्हांला मिळायला हवी. प्रत्येकाने आपापल्या शंका मनातच ठेवल्या तर कसे होणार ? आता, एस.एस.सी. बोर्ड असे म्हणाले, की पाठ्यपुस्तके नवीन आली की आम्ही शिक्षकांसाठी प्रशिक्षण वर्ग घेत असतो; पण त्या प्रशिक्षण वर्गात नेमके काय होते, त्याचा किती उपयोग असतो हे अनेक शिक्षकांना अनुभवावरून माहीत आहे.

दर दहा वर्षांनी अभ्यासक्रमाची पुनर्रचना करताना, ८वी, ९वी, १०वीतील व्याकरणाचा भाग कमी कमीच करत आणलेला आहे. 'सर्वसामान्यांसाठी शिक्षण' हे जरी खरे असले तरी 'सर्वसामान्यांसाठी अगदी जुजबी स्वरूपाचे शिक्षण' असे तत्त्व स्वीकारलेले दिसते. वृत्ते, अलंकार हा आस्वादात्मक भाग, 'व्याकरण चालवा' सारखा व्याकरणाचे मूलभूत ज्ञान जोखून पाहणारा भाग तर १०वीसाठी काढूनच टाकलेला आहे ! विदेशातील मराठी माणसे 'एकता' नावाचे मासिक कॅनडाहून चालवतात, त्यातही ते वृत्ते-अलंकारांचा आस्वादाच्या अंगाने विचार करतात; पण मराठीच्या मायभूमीत - महाराष्ट्रात - मात्र आम्हांला ती नको आहेत. असे का ? याचे एक कारण आम्हां शिक्षकांनाच अजून काही शंका असू शकतात, अभ्यास करावा लागतो, अधिकारी व्यक्तींचे साहाय्य घ्यावे लागते हे लक्षात घेऊन शासनाने तशी अभ्यासमंडळे आमच्यासाठी उपलब्ध करून देण्याची गरज असते.

पाठ्यपुस्तक हे विशेष अभ्यासमंडळाने तयार केलेले असते. यावर्षी इयत्ता १०वीचे पुस्तक खूपच उशिरा बाजारात आले. शाळेतील शिक्षकांना ते मिळण्यापूर्वीच गाईड, स्वाध्याय लिहिणाऱ्यांना व खासगी क्लास घेणाऱ्यांना ते खूप अगोदर मिळालेले असते. त्यामुळे त्यांना शाळा सुरू होण्यापूर्वी त्याचा अभ्यास करणे शक्य असते, तरीही पाठ्यपुस्तकात काय किंवा गाईडमध्ये काय नक्की अडणाऱ्या शब्दांचे, वाक्यांचे अर्थ नसतात. संदर्भही अपुरे असतात. कधीकधी मूळ लेखक, कवी यांना अभिप्रेत नसतो असा आशय गृहीत धरून प्रश्न विचारले जातात. उदाहरणार्थ, पूर्वीचे १०वीचे पाठ्यपुस्तक :

(१) मर्ढेकरांची 'पितात सारे गोड हिवाळा' ही कविता - यातील

नितळ न्याहारिस हिरवी झाडे<br>
काळा वायू हळूच घेती;

ही कविता मी दहा वर्षे शिकवली. या दोन ओळींवर एक प्रश्न असा होता- झाडे न्याहरीसाठी काय घेतात ? माझे असे मत होते, की न्याहारीस म्हणजे न्याहार, तकतकीत तजेलदार पाने असलेली झाडे. पण जसे 'गाईड' सांगते तेच शिक्षक, विद्यार्थी यांना बरोबर वाटते. यातले बरोबर काय ?

(२) तुकडोजी महाराजांची 'नित्य नवे अमुचे जिणे' यातील 'आम्ही पक्षियांप्रमाणे' हा अभंग. यात तुकडोजींनी मानवी मनाच्या चंचलतेचे वर्णन केले आहे. यावर 'तुकडोजी मनाला घरटे व्हायला का सांगतात ?' असा प्रश्न विचारला जाई. माझ्या मते, तुकडोजी परमेश्वराला मानवी मनाचे घरटे होण्याची विनंती करतात. परमेश्वराच्या पायाशी हे चंचल मन स्थिर होईल असा त्याचा भावार्थ. तेव्हा 'तू घरटे

हो'मधील 'तू' म्हणजे परमेश्वर, मन नव्हे.

(३) केशवसुतांची 'आम्ही कोण' ही कविता. या कवितेतील एक ओळ : ''ते आम्हीच, शरण्य मंगल तुम्हा ज्यापासुनि लाभते''

यावर 'केशवसुतांनी स्वत:ला शरण्य का म्हटले आहे ?' असा प्रश्न असे. या ओळीतील स्वल्पविराम लक्षात न घेता अर्थ लावण्याचा प्रयत्न केल्याने असे झाले असावे. याबाबतीत मी मागे मंगेश पाडगावकरांना शंका विचारली होती, तेव्हा त्यांनी 'केशवसुतांनी स्वत:ला शरण्य म्हणवून घेतलेले नाही. शरण्यमंगल अशा परमेश्वराची निर्मितीही आम्ही कवींनीच केली आहे.' असा अर्थ सांगितला होता; पण परीक्षेच्या प्रश्नोत्तरात 'गाईड' 'नवनीत' म्हणेल ते प्रमाण असते !

सध्याच्या इयत्ता ९वी मराठी पाठ्यपुस्तकात मर्ढेकरांचीच 'देवाजीने करुणा केली' ही कविता आहे. तिच्यावर 'एका वाक्यात उत्तर लिहा - झाडूवाली रस्ता कसा झाडते ?' हा प्रश्न पाठ्यपुस्तकातच आहे. ओळी अशा आहेत-

'देवाजीने करुणा केली,
भाते पिकुनी पिवळी झाली.'
देवाजीने करुणा केली,
सकाळ नित्याची ही आली
जणु पायाने चित्त्याच्या अन्
रस्ता झाडी झाडूवाली.

अर्थातच वरील प्रश्नाचे उत्तर गाईडमध्ये असे असणार- 'झाडूवाली चित्त्याच्या पायाने रस्ता झाडते.' पण हा प्रश्नच अप्रस्तुत आहे. कारण 'जणु पायाने चित्त्याच्या' हे वर्णन 'सकाळ'च्या आगमनाचे आहे. पुढच्या कडव्यातील

रोजचीच पण बस ही आली
जणु पायाने हरिणीच्या अन्

हे पाहिले तरी पहिल्या कडव्याचे वाचन कसे करावे ते लक्षात येईल.

सध्याच्या १०वी मराठी पाठ्यपुस्तकात 'देव धावला, देव पावला' ही वामन होवाळांची कथा आहे. त्यात 'पाठवार मोजलं तर मुंडा हात भरंल की' यासारख्या वाक्यांचा अर्थ कळत नाही. तो कुठेही दिलेला नाही. पाठ्यपुस्तक तयार करताना लेखकांना विचारून असे अर्थ पाठाखाली द्यायला हवेत. 'गाईड'मध्येही त्याचा अर्थ नाही !

अशा अनेक गोष्टींकडे वर्षानुवर्षे कोणी लक्ष देत नाही. आमच्यासारख्या शिक्षकांना योग्य व्यक्तीपर्यंत पोचणे नेहमीच शक्य होते असे नाही. शिकवताना मी





अनुक्रमणिका

वर्गात सांगत असे, की 'माझे मत असे आहे, मला असा अर्थ समजला आहे; पण इतरांची मते वेगळी असू शकतात.' शेवटी, विद्यार्थ्यांना वाटते, की एक मार्काच्या प्रश्नाचे काय करायचे ? मतलब, परीक्षेत येणारा प्रश्न व मिळणारा मार्क याच्याशी आहे. कवितेचा अर्थ अगर कवितेची होणारी चिरफाड, व्याकरणाकडे होणारे अक्षम्य दुर्लक्ष याच्याशी कोणालाही काहीही देणेघेणे नाही. दहा-दहा वर्षे तेच प्रश्न व तीच उत्तरे बिनबोभाट स्वीकारली जातात.

तंत्राचेही तसेच. पूर्वी पत्रलेखनास आठ गुण होते; आता चार गुण आहेत. त्यामुळे पत्राच्या शेवटी पाकीट तयार करून प्रति, प्रेषक लिहिण्याची गरज नाही, असे सांगितले जाते. पत्रलेखनाच्या तंत्र व कलेचा संबंध जर प्रत्यक्ष जीवनाशी आयुष्यभर असणार आहे, तर केवळ गुण कमी म्हणून हे लिहिण्याची गरज नाही हे कितपत योग्य ? असेच मतभेद, वेगवेगळे अर्थ, प्रश्न-उत्तरे - पुढील दहा वर्षे - त्यापुढील अनेक वर्षे चालत राहतील. विद्यार्थी उत्तरे घोकतील, परीक्षेत लिहितील, मार्क्स मिळवतील. अभ्यासाच्या आनंदापासून मात्र दूरच राहतील !

'रुची', दिवाळी, २००७

[ टीप : या संदर्भात 'भाषा आणि जीवन'मधील ''शंका...समाधान'' या सदराकडे वाचकांचे लक्ष वेधू इच्छितो. आमच्याकडे येणाऱ्या शंकांना तज्ज्ञांकडून उत्तरे दिली जातात. - संपादक ] ■

**समर्थ बना !**

मराठी समाजाचा उत्कर्ष व्हायचा, तर मराठी समाजाची आर्थिक, सांस्कृतिक ताकद इतकी वाढायला हवी की, मराठीशिवाय मोठ्या शहरांतील पान हलता कामा नये. तामिळनाडूत केवळ तमिळ आणि बंगालात केवळ बंगाली चालते. याचे कारण त्या भाषेतील समाज आपापल्या संस्कृतींचे रक्षण करण्याइतके समर्थ बनले आहेत. मराठी समाजात अनेक गुणवंत आहेत, ते चांगल्या आर्थिक स्थितीतही आहेत; पण आपल्या समाजाविषयी व भाषेविषयी अशा समूहांत आस्था नाही. ज्यांना हा समाज व भाषा टिकाविशी वाटते ते स्वत:च्या अस्तित्वासाठीच झगडत आहेत.

- भारतकुमार राऊत, महाराष्ट्र टाइम्स, १६ मार्च २००८





अनुक्रमणिका

# महाराष्ट्रात येणारे परप्रांतीय

सुनील माळी

१९८१ ते १९९१ आणि १९९१ ते २००१ या काळात परप्रांतांमधून महाराष्ट्रात कसकसे परप्रांतीय आले, हे पाहता महाराष्ट्रात येणाऱ्यांच्या लोंढ्यांमध्ये भक्कम अशी वाढच झाल्याचे स्पष्ट झाले. परप्रांतांतून महाराष्ट्रात ८१ ते ९१ या दहा वर्षांत १५ लाख २५ हजार जण आले. त्यानंतरच्या दहा वर्षांत हाच लोंढा २४ लाख ६३ हजारांवर गेला. ९१ ते २००१ या दशकात आलेल्या २४ लाख ८३ हजारांपैकी उत्तरप्रदेशातून सहा लाख ३९ हजार जण आणि बिहारमधून एक लाख २१ हजार जण आले. उत्तर प्रदेशातून आलेल्यांमधील निम्मे म्हणजे तीन लाख १९ हजार जण रोजगार मिळविण्याकरिता आले. इस्त्रीवाले, टॅक्सीचालक, फेरीवाले यापासून पडेल ते काम करण्याच्या तयारीने हे उत्तर भारतीय मुंबईत आले. बिहारमधून आलेल्यांपैकी तर सत्तर टक्क्यांहून अधिक म्हणजे ७६ हजार ६३२ जण रोजगारासाठी मुंबईत आले. मुंबईत अन्य राज्यांतून येणाऱ्यांमध्ये गुजराथी नागरिकांचे प्रमाणही मोठे आहे. १९९१ ते २००१ या काळात गुजराथमधून महाराष्ट्रात एक लाख चाळीस हजार जण आले, परंतु त्यातील ३१ हजार २०९ जण म्हणजे केवळ २२/२३ टक्केच जण रोजगारासाठी महाराष्ट्रात आले होते. रोजगाराव्यतिरिक्त विवाह होऊन येणाऱ्यांची तसेच कुटुंबाबरोबर स्थलांतरित होणाऱ्यांची संख्याही लक्षणीय आहे. इतर राज्यांपैकी पश्चिम बंगालमधून ८४ हजार जण (त्यांपैकी रोजगारासाठी ५३ हजार जण), मध्य प्रदेशातून ३१ हजार जण (त्यांपैकी रोजगारासाठी ११ हजार जण), ओरिसातून २९ हजार जण (त्यांपैकी रोजगारासाठी १८ हजार जण), राजस्थानमधून एक लाख चार हजार जण (त्यांपैकी रोजगारासाठी ४० हजार जण), दिल्लीतून १९ हजार जण (त्यांपैकी रोजगारासाठी पाच हजार आठशे जण), पंजाबमधून नऊ हजार पाचशे जण (त्यांपैकी रोजगारासाठी तीन हजार एकशे जण), आसाममधून चार हजार तीनशे जण (त्यांपैकी रोजगारासाठी एक हजार नऊशे जण) या दहा वर्षांमध्ये मुंबईत आले. मुंबईखालोखाल पुण्यामध्ये परप्रांतीयांचा शिरकाव झाला आहे. पुण्यात १९९१ ते २००१ या दशकात सात लाख ३७ हजार जण आले. पुण्यात येणाऱ्या परप्रांतीयांमध्ये मात्र वेगळेच वैशिष्ट्य

ढळते. पुण्यात येणाऱ्या परप्रांतीयांमध्ये पहिला क्रमांक पटकावला आहे तो ाटकाने. त्या राज्यातून ६१ हजार जण या दशकात पुण्यात आले. अर्थात त्या लोखालचा क्रमांक उत्तर प्रदेशचा आहेच. त्या राज्यातून ३९ हजार जण या ळामध्ये पुण्यात आले. त्यापैकी १८ हजार जण रोजगाराकरिता पुण्यात आलेले ा. राजस्थान आणि आंध्र प्रदेशातून प्रत्येकी २१ हजार जण (रोजगारासाठी प्रत्येकी हजार जण), गुजराथमधून ११ हजार जण (रोजगारासाठी दोन हजार चारशे ा), मध्य प्रदेशातून दहा हजार जण (रोजागारासाठी तीन हजार एकशे जण), ाम बंगालमधून ९४८१ जण (रोजगारासाठी चार हजार पाचशे जण), ओरिसातून ा हजार सातशे जण (रोजगारासाठी दोन हजार जण), आसाममधून दोन हजार ाशे जण (रोजगारासाठी ४२८ जण) या काळात पुण्यात आले. नागपूरमध्ये दोन ज्ञ चाळीस हजार परप्रांतीय १९९१ ते २००१ या दशकात दाखल झाल्याचे स्पष्ट ा.

■

लोकसत्ता, १९-०२-०८

### समर्थ शरीर, निकोप आत्मा

मराठीचा विकास व्हायचा तर मराठी समाजाचा तितक्याच वेगाने विकास व्हायला हवा. मराठी सनदी अधिकारी मोठ्या प्रमाणात आले, तर राज्यव्यवहारात मराठीची सक्ती करावीच लागणार नाही आणि मराठीत बोर्ड लावल्याने दुकानांतील विक्री वाढते, असे जर व्यापाऱ्यांच्या ध्यानात आले, तर तिथे कोणी इंग्रजीचा वापर करणार नाही. बळी तोच कान पिळी, हा जगाचा सिद्धांत असल्याने जर बंगाली, तमिळ, तेलुगु या भाषांप्रमाणेच मराठीचा सन्मान निदान स्वतःच्या राज्यात व्हावा, असे ज्यांना वाटत असेल, त्यांनी दुसऱ्यांना मराठी शिकवण्याऐवजी व मराठीची सक्ती करण्याऐवजी या भाषेशिवाय चालणार नाही, अशी स्थिती निर्माण करायला हवी. समर्थ शरीरात निकोप आत्म्याचा निवास असतो. मराठी समाजही समर्थ झाला, तर त्याचा आत्मा असलेली मराठी भाषाही तशीच निकोप व निर्मळ स्मित करेल. ■

- भारतकुमार राऊत, महाराष्ट्र टाइम्स १६-०३-०८

**प्रतिसाद-१**

# मिलिंद मालशे यांचे ज्ञानमूलक सौंदर्यज्ञान... नको रे बाबा !

**प्रशान्त बागड**

(१) डॉ. मिलिंद मालशे यांनी माझ्या पुस्तकपरीक्षणाची दखल घेऊन त्यावर लिहिलेल्या आठ पानी प्रतिक्रियेचे मी स्वागत करतो. परंतु हे स्वागत करताना माझी मन:स्थिती पूर्णत: आनंदी नाही. एक प्रकारची खिन्नताही आनंदाच्या जोडीला आहे. माझ्या खिन्नतेची दोन कारणे आहेत. पहिले कारण म्हणजे मालश्यांनी माझ्यावर आरोपित केलेले अज्ञान; आणि दुसरे कारण म्हणजे माझ्या आक्षेपांना उत्तर देताना त्यांनी विनाकारण मला बहाल केलेली व्यक्तिगत दूषणे.

अगोदर माझ्या अज्ञानाबद्दल लिहितो. मी ज्ञानी आहे असा दावा मला मुळीच करायचा नाही. पण अज्ञानी मनुष्याने, मूर्खाने व्यक्त केलेलं मतही सत्य असू शकतं हे लक्षात घेणं अत्यंत आवश्यक आहे. 'एखादं मत व्यक्त करणारा मनुष्य' आणि 'त्याने व्यक्त केलेलं मत' ह्या दोन मूलत: भिन्न गोष्टी आहेत. त्यांच्यात गल्लत करता कामा नये.

मालश्यांनी साधीसोपी द्वैतं मांडून प्रतिवाद करण्याचा प्रयत्न केला आहे. सुरुवात शीर्षकापासूनच होते. बागड यांचे सौंदर्यशास्त्र अज्ञानमूलक (पक्षी : मालश्यांचे ज्ञानमूलक); बागडांचे ते 'वरवरचे वाचन' तर मालश्यांचे ते 'खोलवरचे खणणे'; बागडांचे आकलन निरागस (पक्षी : मालश्यांचे प्रगल्भ). ज्यास आपण अज्ञानमूलक, निरागस व वरवरचे संबोधत आहोत ते तथ्ययुक्त असूच शकत नाही किंवा ही विशेषणं डकवल्यावर त्या तथ्याकडे लक्ष द्यायची जरूरच पडणार नाही, हे या मागचे गृहीतक आहे. मालश्यांनी घेतलेला पवित्रा हा एक प्रकारचा नकली 'लोगोसेंट्रिझम'च आहे. इथे 'लोगॉस'ची तळी उचलणारा 'मी म्हणतो ते लोगॉस, ते बरोबर, ते सत्य' असा दावा करतोय. साध्या भाषेत याला 'दादागिरी' म्हणतात.

(२) कॉलिंगवुडच्या ग्रंथाच्या मालशेकृत भाषांतरावरील माझ्या परीक्षणाचे दोन भाग पडतात. पहिल्या भागात (बागड २००७ : २४ व २५) मी कॉलिंगवुड यांच्या कलामीमांसेची संक्षिप्त, धावती ओळख करून दिलेली आहे. आणि दुसऱ्या भागात (पृ. २६ ते २९.) मालशेकृत भाषांतराचे माझे मूल्यमापन सादर केलेले आहे.

परीक्षणात अशी सुस्पष्ट विभागणी दाखविलेली नसली तरी हे विभाजन समजून घेताना काही अडचण येऊ नये. कॉलिंगवुडचा परिचय करून देताना मी त्यांचा मुख्य अभिव्यक्ती सिद्धांत, त्यांचा 'कॉन्टिनेण्टल' कल, त्यांची घेतली गेलेली/जाणारी दखल त्यांच्या ग्रंथातील एक 'चमत्कारिक आशयसूत्र' आणि रा.भा. पाटणकरांनी पूर्वीच त्यांच्यावर लिहिलेले चांगले पुस्तक ह्या बाबी अगदी थोडक्यात मांडल्या आहेत. यातील प्रत्येक सूत्राचा मला विस्तार करता येईल आणि त्याविषयीचे समर्थनपर युक्तिवादही मांडता येतील. परंतु मालशेकृत भाषांतराचे परीक्षण ही काही त्यासाठीची जागा नव्हे. त्यामुळे मी केवळ उल्लेख वा सूचन करून थांबलो आहे; पुढे गेलेलो नाही. दुसऱ्या भागात मालश्यांच्या भाषांतरातील गंभीर चुका, दोष, उणिवा मी सोदाहरण स्पष्ट केल्या आहेत. मी त्यांचा केवळ निर्देश करून थांबलेलो नाही. परिणामी मालश्यांनी आपल्या प्रतिक्रियेत केवळ (निदान प्राधान्याने) ह्या दुसऱ्या भागावर लक्ष केंद्रित करायला हवे होते ही अपेक्षा अस्वाभाविक ठरू नये. नाही. त्याऐवजी त्यांनी पहिल्या दीडपानी भागाचे कसून वाचन करून माझे 'अज्ञान' उघडकीस आणण्याचा चंग बांधल्याचे दिसून येते. त्यामुळे मी मांडलेल्या काही आक्षेपांकडे सोयीस्करपणे दुर्लक्ष करणे त्यांना जमले आहे.

(३) कॉलिंगवुड : एक कॉन्टिनेण्टल तत्त्वज्ञ

सगळ्यात पहिली गोष्ट, माझ्या परीक्षणाचा मुख्य उद्देश कॉलिंगवुड हे निर्विवादपणे आणि नि:संदिग्धपणे कॉन्टिनेण्टल तत्त्वज्ञ होते हे सिद्ध करणे हा नव्हता. स्वत: मालश्यांनी उद्धृत केलेले माझ्या परीक्षणातील वाक्य असे आहे : ''...विश्लेषक तत्त्वज्ञानाच्या ऐन धामधुमीत ... आज इंग्रजीभाषिक देशांत 'कॉन्टिनेण्टल तत्त्वज्ञान' म्हणून उल्लेखिल्या (व पुष्कळ अंशी हेटाळल्या) जाणाऱ्या *परंपरेशीही सलगी साधणारं* कलेचं तत्त्वज्ञान कॉलिंगवुड यांनी मांडलं'' (बागड २००७, २४, आघात आताचा) तिरप्या ठशातील तीन शब्दांतील खुलेपणा महत्त्वाचा आहे. तथापि ह्या एका वाक्यावरून मालश्यांनी अनेकानेक निष्कर्ष काढून दाखविले आहेत. फक्त दोन फर्मास उदाहरणं देतो : (१) मी कॉलिंगवुडचा फेनमेनॉलजी व अस्तित्ववाद यांच्याशी सलगीचा संबंध जोडतो. (२) हेगेल आणि हुसर्ल यांच्या फेनमेनॉलजीच्या सिद्धांतांमधे जमीन-अस्मानाचा फरक आहे हे माझ्या गावीही नाही (मालशे २००७, ६०-६१). यातील दुसरा निष्कर्ष जास्त गमतीदार आहे; कारण त्याचा घाट असा आहे : मी, समजा, सोलापूरबद्दल काही म्हणालो तर एखाद्याने मला दटावावं, 'मुंबई आणि नागपूर यांच्यात फरक आहे हे लक्षात असू द्या.' कॉलिंगवुडना कदापिही 'कॉन्टिनेण्टल तत्त्वज्ञ' म्हणता येणार नाही हे सिद्ध करण्याची खटपटच मालश्यांनी चालवली आहे. ते

लिहितात, ''...कॉन्टिनेण्टल फिलॉसॉफीशी (म्हणजे हुसर्ल, हायडेगर, सार्त्र इत्यादी विचारवंतांच्या परंपरेशी) कॉलिंगवुड यांची सलगी तर सोडाच, दूरान्वयानेही काही संबंध नाही'' मी ज्या अर्थाने विश्लेषक विरुद्ध कॉन्टिनेण्टल ही जोडगोळी वापरली तो अर्थ - इंग्रजी लकबीने म्हणायचं तर, अरेरे - मालशयांच्या ध्यानातही आला नाही. मी यावर अधिक काही भाष्य न करता 'पेंग्विन डिक्शनरी ऑफ फिलॉसॉफी'मधील 'कॉन्टिनेण्टल फिलॉसॉफी'वरील नोंदीतील काही भाग उद्धृत करतो :

**कॉन्टिनेण्टल तत्त्वज्ञान :** *विश्लेषक तत्त्वज्ञान या संज्ञेशी विरोधसंबंध दाखविण्यासाठी वापरली जाणारी संज्ञा... शैली, विषयनिवड, लेखनपद्धती ह्या बाबतीत त्या दोहोंत विरोध दिसून येतो. हेगेल, नीत्शे, क्रोचे, यास्पर्स, हायडेगार, कॉलिंगवुड, अॅडोर्नो, सार्त्र, फूको... देरिदा आदि तत्त्वज्ञ कॉण्टिनेण्टल प्रवाहातील मानले जातात... टीकाकारांना त्यांचे प्रकल्प अति महत्त्वाकांक्षी, व लेखन दुर्बोध वाटते... तर फ्रेगऽ... रसेल, मूर... पॉपर आदि तत्त्वज्ञ विश्लेषक प्रवाहातील मानले जातात. ह्या तत्त्वज्ञांनी तर्कशास्त्राकडे पुरविलेल्या अवधानामुळे त्यांचे टीकाकार असा आरोप करतात की उपकरणांचा वापर करण्यापेक्षा त्यांना धार लावण्यात ह्या तत्त्वज्ञांना अधिक रस आहे.*

*(मॉटनर, २००० : १११)*

(४) पाटणकरांचे सौंदर्यशास्त्र

माझ्या परीक्षणाचा मुख्य उद्देश पाटणकरांच्या सौंदर्यशास्त्रीय लेखनाच्या गुणावगुणांचा निर्णायक न्यायनिवाडा करणे हा नव्हता. पाटणकरांच्या कॉलिंगवुडवरील पुस्तकाचा मी प्रशस्तिपर उल्लेख केला आहे, याचे कारण असे की कॉलिंगवुडवर इतके सुजाण भाष्य मराठीत उपलब्ध असताना कॉलिंगवुडच्या ग्रंथाचे भाषांतर उत्तमच व्हायला हवे होते. परंतु भाषांतरकारांनी कित्येक सांकल्पनिक प्रमाद करून ठेवले आहेत. पाटणकरांच्या लेखनप्रकल्पाचे स्वरूप मला माझ्या पद्धतीनुसार समजलेले आहे, आणि त्याहीपुढे जाऊन मी त्याचे मूल्यमापन करू धजलो आहे. पाटणकरांचं लेखन ही काही मला जपून ठेवून पूजा करायची वस्तू वाटत नाही. इथे मालशयांनी स्वत: लेबलडकवेगिरी करून माझ्या वाचनाला 'जुजबी' आणि 'लेबल लावण्यापुरते' म्हटले आहे.

(५) इमोशन आणि फीलिंग

कॉलिंगवुडने केलेला हा फरक मालशयांनी कुणाला व का समजावून दिला आहे हे मला कळलेले नाही. यावर ते पुढेही काही म्हणाले तरी मला त्यावर एक शब्दही

दवडायचा नाही हे आताच सांगून ठेवतो.

(६) 'चमत्कारिक आशयसूत्र'

मी असे म्हटले होते : ''त्यातच खरी कलाकृती डोक्यात असते, जगात नसते. भौतिक कलाकृती ही दुय्यम व बिनमहत्त्वाची चीज असते, असे एक अत्यंत चमत्कारिक आशयसूत्र... पेरून स्वत: कॉलिंगवुड यांनी आपल्या कलामीमांसेप्रति प्रतिकूल ग्रह वाढीस लागण्यास हातभारच लावला आहे.'' (बागड २००७ : २५). मला वाटते माझे हे विधान संदर्भांकित व संतुलित आहे. माझं फक्त एक चुकलं की मी 'प्रथमदर्शनी तरी' ह्या सावध वाक्प्रयोगाची योजना करायला हवी होती. चित्र, शिल्प, गाणं हे कलावंताच्या 'डोक्यात' असतं हे प्रथमदर्शनी तरी चमत्कारिक, चुकीचं, अस्वीकार्य वाटतं. मग मालश्यांची 'कान्ट-क्रोचे-कॉलिंगवुड ही सौंदर्यशास्त्रीय परंपरा' आपल्याला काहीही सांगो. चित्र कॅन्व्हासवर असतं, गॅलरीत टांगलेलं असतं - म्हणजे ते जगात असतं, नुसतं डोक्यात असून भागत नाही. डोक्यातलं चित्र चित्रकाराने प्रत्यक्षात रंगवलंच नाही, भौतिक स्वरूपात निर्मिलंच नाही तर ते आपल्याला दिसणार कसं, त्याने काहीतरी निर्माण केलं असं आपण म्हणणार तरी कसं ? मग भौतिक कलाकृती दुय्यम असते असं कॉलिंगवुड म्हणतोच कसं ? हे प्रश्न पडतात, कॉलिंगवुडचं म्हणणं 'कॉमनसेन्स'ला पटत नाही, म्हणून मी त्यास 'चमत्कारिक' म्हटलं. असं म्हणणारा मी पहिला किंवा एकटा नव्हे. शिवाय ह्या प्रथमदर्शनी विचित्र वाटणाऱ्या विचाराचे पटणारे खोल अर्थ आहेत याची मला जाणीव नाही असे नव्हे. शंका घेणं, अनुभवाशी ताडून बघणं ह्या पुढ्यातला विचार तपासण्यासाठी, आवश्यक बाबी असतात, इतकी प्राथमिक गोष्टही लेखनात गृहीत धरायची नाही काय ? प्रिय कॉलिंगवुडबाबत मी याहून धक्कादायक व भयंकर विधानं करू शकतो. सबब अशा साध्यासाध्या विधानांनी डरून जाऊ नये आणि आपल्या समीक्षकाचा पाडाव अनायासे होऊन जाईल ह्या हिशेबाने कान्ट-क्रोचे-कॉलिंगवुड यांच्या पदराआड दडू नये. तो पदर संरक्षक नसण्याची दाट शक्यता आहे. त्यातून आपला बाबावाक्यप्रमाणवादच फक्त नीटपणे उघड होतो.

(७) खरी कलाकृती डोक्यात असते, ह्या सूत्रास 'आयडिअल थिअरी ऑफ आर्ट'असे संबोधून रिचर्ड वॉल्हेम यांनी कॉलिंगवुडच्या एकूणच अभिव्यक्ती-सिद्धांताची विल्हेवाट लावण्याचा प्रयत्न केला आहे (पहा : वॉल्हेम १९८०, छेदक ४४ ते ५०.) त्यामुळे ''एक्सप्रेशन' म्हणजे मनामध्ये निर्माण झालेली विशिष्ट, अनन्य प्रतिमा'' हे मालश्यांचे (२००७ : ६५) वाचन कॉलिंगवुडची कलामीमांसा वॉल्हेमच्या समीक्षेचे अतिनाजूक भक्ष्य ठरण्याची शक्यता निर्माण करते. तर कॉलिंगवुडची अशी - आयडिॲलिस्टिक

- भूमिका नव्हतीच, असा वेधक युक्तिवाद अलीकडे अेरन रिडले (१९९८) यांनी केला आहे. मालशे (२००७ : ६५) जाहीर करतात, ''खरे म्हणजे 'माध्यम', 'वाचक' इत्यादी संकल्पनांना एक्स्प्रेशनिस्ट सिद्धांतामध्ये फारसे स्थान नाही.'' तथापि वाचकाचे स्थान, भूमिका, महत्त्व ह्या विषयांवर कॉलिंगवुड यांनी पुष्कळ भागांत विवेचन केले आहे. उदाहरणार्थ : ६.२ - दि आर्टिस्ट अँड दि ऑर्डिनरी मॅन; ६.३ द कर्स ऑफ दि आयव्हरी टॉवर; सबंध प्रकरण १४ - दि आर्टिस्ट अँड द कम्युनिटी.

(८) परीक्षणाच्या सुरुवातीला कॉलिंगवुड भावना, अभिव्यक्ती व माध्यम ह्या तीन संकल्पना अभिनव रीतीने एकत्र आणतात यावर मी भर दिला होता. तो माझ्या डोक्यातला 'एकच गोंधळ' असल्याचे कोणताही आधार न देता मालश्यांनी (२००७ : ६३)जाहीर केले आहे. कॉलिंगवुडने स्वतः माध्यम हा शब्द योजिलेला नाही व त्यांचा सिद्धांत माध्यमाचे महत्त्व अधोरेखित करतो हा एक अन्वयार्थ आहे, हे मी परीक्षणातच स्पष्ट केलेले आहे. कॉलिंगवुड यांच्या ग्रंथातील ही सर्वोत्तम चीज आहे असे मी स्वतः मानतो. परंतु इथे त्याविषयी सविस्तर चर्चा करण्याचे प्रयोजन नाही.

(९) मी लिहिले होते : ''कॉलिंगवुडच्या मूळ परिच्छेदातील ह्या दोन्ही संज्ञांच्या ('भाषा' आणि 'जाणीव') प्रवेशसमयीच्या वाक्यात विसर्ग आहे.'' तर मालश्यांनी (२००७ : ६७) माझा समाचार घेण्याच्या नादात लिहिले आहे : ''मुळात प्रवेशसमयी विसर्ग नसून संज्ञा संपल्यानंतर आहे !'' मी ''प्रवेशसमयीच्या वाक्यात'' म्हटले आहे; '(संज्ञांच्या) वाक्यातील प्रवेशसमयी'' नाही ! ज्या वाक्यांत ह्या संज्ञा प्रथमतः येतात त्या वाक्यांमध्ये विसर्गचिन्हाची योजना आहे.

(१०) ब्युटिफुल आणि इस्थेटिक

माझ्या आक्षेपांपैकी फक्त एकाविषयी पुन्हा लिहितो. माझा आक्षेप असा होता की भाषांतरकारांनी 'इस्थेटिक'साठी रुळलेला 'सौंदर्यात्मक' हा प्रतिशब्द वापरल्यामुळे त्याचे 'ब्युटिफुल'पासूनचे वेगळेपण नीट व्यक्त होत नाही. यावर मालश्यांनी कॉलिंगवुडचा परिच्छेद उद्धृत करून त्यातील मुद्दा स्पष्ट करून सांगितला आहे. परंतु भाषांतरात ती स्पष्टता उमटत नाही. ह्या संदर्भातील दुसरे एक वाक्य बघा : ''सौंदर्याविषयीच्या सिद्धान्ताचा संबंध... सौंदर्यात्मक सिद्धान्ताशी जोडल्यामुळे 'वास्तववादी' पायावर आधारून...'' (मालशे २००४, ४७). आता इथे पहिल्यांदा येणारा 'सौंदर्याविषयीचा सिद्धांत' म्हणजे 'थिअरी ऑफ ब्युटी' आहे तर दुसऱ्यांदा येणारा 'सौंदर्यात्मक सिद्धांत' म्हणजे 'इस्थेटिक थिअरी' आहे. पण वाचकाला हा फरक कळणार कसा ? त्यासाठी 'इस्थेटिक'ला नवा शब्द शोधला पाहिजे. आणि ही फक्त शब्दांची गोष्ट नाही. मराठीत 'इस्थेटिक्स'ला आपण सर्रास 'सौंदर्यशास्त्र'

म्हणत आलो आहोत, याचाच पुनर्विचार केला पाहिजे. कॉलिंगवुडच्या चमत्कारिक आशयसूत्राचं नातं काण्टच्या ''डिसइन्टरेस्टेड पर्सेप्शन ऑफ ॲपिअरन्स''शी असलं तरी सौंदर्याला केंद्रस्थान देणाऱ्या पारंपरिक इस्थेटिक्सशी कॉलिंगवुड भांड भांड भांडताना दिसतात. कलामीमांसेचे सौंदर्यशास्त्राविरुद्धचे हे बंड आहे. मालशेकृत भाषांतर हा पैलू वा पदर सरळसरळ दडपून टाकते.

(११) साडेतीनशे पृष्ठांच्या पुस्तकाचं भाषांतर करताना लागणारे कष्ट आणि होणारी यातायात मी अर्थात कल्पू शकतो. परंतु कॉलिंगवुडच्या विचारांचं मराठीत नीट अभिसरण व्हावं असं मनापासून वाटत असल्यामुळे हे सारे आग्रह आणि उपद्व्याप.

**संदर्भ :**


पाटणकर, रा. भा., १९९५, *कॉलिंगवुडची कलामीमांसा - एक भाष्य,* प्राज्ञ पाठशाळा मंडळ, वाई.

बागड, प्रशान्त, २००७, 'कॉलिंगवुडवर लादलेला मराठी अवतार', *भाषा आणि जीवन,* २५:३, पृ. २४-२९.

मालशे, स.गं., व मालशे, मिलिंद (अनु.) २००४, *कलेची मूलतत्त्वे,* महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई (कॉलिंगवुड १९३८चे मराठी भाषांतर).

मालशे, मिलिंद, २००७, 'प्रशान्त बागड यांचे अज्ञानमूलक सौंदर्यशास्त्र', *भाषा आणि जीवन,* २५:४, पृ. ६०-६७.

Audi, Robert (ed.), 1999, *Cambridge Dictionary of Philosophy*, (2nd Ed.), Cambridge University Press : Cambridge.

Collingwood, R. G., 1938, *Principles of Art*, Oxford University Press : London

Mautner, Thomas (ed.), 2000, *Penguin Dictionary of Philosophy*, Penguin Books, London.

Ridley, Aaron, 1998, *Collingwood : A Philosophy of Art*, Phoenix, London

Woollheim, Richard, 1980, *Art and Its Objects*, (2nd Ed.), Cambridge University Press, Cambridge.


■


पत्ता : द्वारा - शरद सोमण, 1411/1, शुक्रवार पेठ, पुणे 411002

# अखेर दखल घेणारा भेटला !

कृ. श्री. अर्जुनवाडकर

(१) *भाषा आणि जीवन*, २५.३ (पावसाळा २००७) या अंकात डॉ. माणिक धनपलवार यांच्या लेखसंग्रहाच्या संदर्भात पृ. ४६वर महाराष्ट्र-प्रयोगचंद्रिका (१९७०) या पुस्तकावर धनपलवारांनी लेख लिहिल्याचा उल्लेख आहे. हा लेख *भाषा आणि जीवन*, पावसाळा २००३ या अंकात आला आहे, याची मला माहिती नव्हती. ती या कालिकाच्या संपादकांकडून मिळाल्यावर मी प्रस्तुत अंक मिळवून हा विस्तृत लेख (महाराष्ट्र-प्रयोगचंद्रिका : एक अवलोकन; पृ. ३०-४०) समग्र वाचला. डॉ. धनपलवारांचा, तंजावर प्रदेश आणि आसमंत यांतील मराठी भाषेचा सखोल अभ्यास आहे. त्यांनी या माझ्या ग्रंथातील संपादकीय विवेचन तसेच मराठी व्याकरणाचा इतिहास (१९९२) या माझ्या अन्य ग्रंथातील निर्दिष्ट ग्रंथाचा परामर्श ही दोन्ही वाचून त्यातील माहितीत आवश्यक ती भर घातली आहे, दुरुस्ती केली आहे, यासाठी मी त्यांचा ऋणी आहे. माझे मुख्य अभ्यासक्षेत्र वेगळे असल्यामुळे माझा या क्षेत्रातल्या मराठीचा अभ्यास संपादित ग्रंथापुरता मर्यादित आहे. हा ग्रंथ समक्ष पाहून त्याचा परिचय करून दिला नाही, तर माझा इतिहास अपूर्ण राहील, या जाणिवेने मी मद्रासपर्यंत प्रवास, तेथल्या हस्तलिखित-संग्रहालयात ''*चंद्रिके*चा शोध, हस्तलिखित सापडल्यावर त्याची शुद्ध नक्कल करण्यासाठी मुक्काम हा सर्व खटाटोप केला. असे हस्तलिखित या ठिकाणी आहे याचा पत्ता मला इतिहासाचार्य राजवाड्यांच्या एका लेखावरून लागला. हा लेख वाचणाऱ्यांपैकी कोणाही मराठीच्या संशोधकाने ''*चंद्रिके*ची अधिक माहिती मिळविण्यासाठी प्रयत्न केलेला नव्हता, नाही, असे मला चौकशीअंती आढळले. म्हणून मी हा खटाटोप केला. या माझ्या खटाटोपाचे मोल जाणणारा विद्वान माणूस इतक्या काळाने (३३ वर्षे !) भेटला, हेही नसे थोडके ! एकंदरीने अशा तांत्रिक, शास्त्रीय विषयात लक्ष घालणारी माणसे मराठीत दुर्मीळ आहेत. असे नसते तर मी लिहिलेल्या मराठी व्याकरणाच्या इतिहासाच्या शेकडो प्रतींचे गठ्ठे माझ्या घरातल्या माळ्यावर पडून राहिले नसते !

(२) छंद:शास्त्रातल्या लघुगुरूंच्या खुणांविषयी मराठीत प्रचारात असलेले संकेत या

विषयावर *भाषा आणि जीवन*, २५:४ (दिवाळी २००७) या अंकात शुभांगी पातुरकर यांचा लेख आहे. संस्कृत हस्तलिखितांतून प्रचारात असलेली लघु (।) आणि गुरु (ऽ) यांची चिन्हे शास्त्रीय आहेत, ती वापरावीत, असे कवीश्वरांचे म्हणणे आहे, असे त्यांनी म्हटले आहे.

माझ्या मते हा मुद्दा शास्त्रीय-अशास्त्रीयतेचा नसून सोयीचा आहे. इंग्रजी राज्याच्या काळात भारतीयांनी अनेक गोष्टी इंग्रजीतून उचलल्या. आजची विरामचिन्हे इंग्रजीतूनच आली आहेत. जुन्या हस्तलिखितांतून केवळ दंड (एकेरी ।, दुहेरी ॥) एवढे एकच विरामचिन्ह आढळते. ते शास्त्रीय ठरवून पुन्हा त्याकडे वळणे हे कसे सयुक्तिक ठरावे ? गणितातली आज रूढ असलेली सर्व चिन्हे तरी कुठे जुन्या काळातून आली आहेत ? व्यवहारातही वेषभूषा, केशसंस्कार, पादत्राणे, लेखनसाधने, रोज़च्या जीवनातल्या वस्तू (उदा० दात घासायचा ब्रश, घड्याळ, चष्मा, श्रवणयंत्र, विजेचे दिवे...) सार्वजनिक सोयी (अक्षरजुळणी, छपाई, वृत्तपत्रे...) इत्यादी बाबतीत इंग्रजी सत्तेच्या काळात आपल्या देशात किती तरी बदल झाले आहेत. ते सगळे अशास्त्रीय काय ? यंत्रयुगाने तर अगणित प्रकार जीवनात आणले आहेत. (रेडिओ, टीव्ही...) ते इतके रुळले आहेत की त्यांच्यावाचून जगण्याची कल्पनाच करवणार नाही. अंकपद्धती (1 2 3...0), दशमानपद्धती भारतातून जगात पसरली. देवनागरी आणि १-२-३...० इंग्रजी 1-2-3...0 यांची तुलना करून पाहा... तिला जग अशास्त्रीय म्हणत नाही. ती जगाला माहीत झाल्यावर पसरट ग्रीक अंकनपद्धती (I II III IV..., i ii iii iv...) इतिहासजमा झाली; आता ती केवळ सोय म्हणून मर्यादित बदलांपुरती (विभाग, उपविभाग, उप-उपविभाग...) येते. लिपी, अंकचिन्हे, विरामचिन्हे अशा घटना सोयीचा भाग आहेत; त्यांत शास्त्रीय/अशास्त्रीय चर्चा अप्रस्तुत आहे. लेखिका पातुरकर यांनीही कवीश्वरांचे म्हणणे अयोग्यच ठरविले आहे. ■

1192, शुक्रवार पेठ, पुणे 411 002. दूरध्वनी 24479419

## परीक्षणासाठी आलेली पुस्तके

- **'पायपोळ'** - सुचिता खल्लाळ, पद्मगंधा प्रकाशन, पुणे. २००७, पृष्ठे ७१, किंमत ७०/-
- **'लाटांचे मनोगत'** - डॉ. नीलिमा गुंडी, पद्मगंधा प्रकाशन, पुणे ३८. २००८, पृष्ठे १५९, किंमत १३०/-
- **'अक्षरस्पंदन'** - डॉ. नीलिमा गुंडी, उन्मेष प्रकाशन, पुणे ३०. २००८, पृष्ठे १६८, किंमत १२०/-
- **'भाषाभान'** - डॉ. नीलिमा गुंडी, उन्मेष प्रकाशन, पुणे ३०. २००८, पृष्ठे १७२, किंमत १५०/-

**प्रतिसाद-३**

# दुर्बोध परिभाषा

**- विजय पाध्ये**

डॉ. द.भि. कुलकर्णी यांच्या ललित लेखनाचा मी चाहता आहे, त्यांच्या अनेक पुस्तकांचा मी आस्वाद घेतला आहे. तथापि, त्यांचा 'भाषिक प्रतिभा' हा लेख अतिशय रुक्ष, सामान्य वाचकाला वाचनातून आनंद वाटण्याऐवजी कंटाळा येईल असा वाटला. 'अन्यूनअनतिरिक्त', 'एकप्रयत्नोपाद्य', 'चांचल्य', 'प्रचुर प्रमाण' अशा शब्दप्रयोगांच्या जागी वाचकाला सहज समजतील अशा शब्दांची योजना करता आली असती तर लेख वाचताना माझ्यासारख्या भाषाप्रेमी वाचकाला आनंद झाला असता. प्रस्तुत लेखाचा विषय ललित लेखनापेक्षा वेगळा आहे हे समजू शकतो; परंतु मराठी अभ्यास परिषद ही 'केवळ ५० वर्षांपुढील वयाच्या लोकांसाठी' असायला नको असेल आणि तरुण तसेच सर्वसामान्य भाषाप्रेमी मराठी लोकही परिषदेत यावेसे वाटत असतील, तर परिषदेच्या प्रकाशनांतील लेखनाची भाषा सुटसुटतीत, वाचकाला विषय सहज समजेल अशी असावी, असे मला वाटते.

■

**प्रतिसाद-४**

# बोलीभाषा आणि परिभाषा

**- डॉ० द.भि. कुलकर्णी**

[ संदर्भ : विजय पाध्ये यांचा 'दुर्बोध परिभाषा' हा प्रतिसाद ]

भाषा संचालनालयाने 'साहित्य समीक्षा परिभाषा कोशा'चे काम हाती घेतले होते आणि त्यासाठी एक उपसमिती 'गठित' केली होती. त्या समितीचे अध्यक्ष होते प्रो० वा.ल. कुलकर्णी, मंगेश विठ्ठल, रा.भि., भगवंतराव देशमुख, रा.भा. पाटणकर, श्री.पु. भागवत असे आम्ही सदस्य होतो; यशवंतराव कानिटकर होते संचालक...

संस्कृतप्रचुर परिभाषेबद्दल भागवतांची नाराजी होती; ती तिथे सतत प्रकट होई. मी म्हणे, ''अहो, परिभाषा सुबोध-दुर्बोध अशी काही नसते. तो संकल्पनांचा एक

व्यूह असतो. त्यात शब्दांची कुळे असतात. संस्कृत उपसर्ग-प्रत्यय यामुळे अशी संज्ञांची कुळे सुसंगतपणे तयार होतात; देशी शब्दांपासून ती तशी होत नाहीत;'' पण भागवतांना हे मत कधी पटले नाही. 'साहित्याची भूमी'मध्ये पुन्हा त्यांनी म्हटले, ''खरं म्हणजे संस्कृतोद्भव परिभाषेमुळे आणि संस्कृतप्रचुर भाषेमुळे खुद्द मराठीही सर्वसामान्य श्रोत्यांच्या आकलनाबाहेर जाऊ लागेल की काय अशी भीती वाटते.'' बोली, भाषा आणि परिभाषा यांच्यातील भेद ज्यांना माहीत आहे त्यांना अशी भीती वाटत नाही ! ■

'अपार्थिवाचे चांदणे', पद्मगंधा प्रकाशन, पुणे, १९९९, पृ. १८७

**प्रतिसाद-५**

# भाषांतरातील वारकावे

**जयप्रकाश सावंत**

[ संदर्भ : 'भाषा आणि जीवन' २६ : १ (हिवाळा २००८)च्या अंकातील 'अरेबा परेबा आणि इतर कथा' या कथासंग्रहाचे सविस्तर व सखोल परीक्षण.]

या परीक्षणात एकीकडे उदय प्रकाश यांच्या कथेची वैशिष्ट्यं आणि बलस्थानं यांचा निर्देश केला गेला आहे; तर दुसऱ्या बाजूने मूळ लेखनाशी अनुवाद ताडून पाहत, त्यातील एकेका शब्दाचा विचार करत अनुवादातले गुणदोष दाखवले आहेत, याचं मला फार विशेष वाटलं. मराठीत असं अनुवादाच्या अंगाने पाहिलेलं सहसा आढळत नाही. डॉ. जया परांजपे यांनी उल्लेख केलेल्या खटकणाऱ्या जागांचीही मी नोंद घेतलीय. त्यातील काही बाबींविषयी थोडेसे अधिक :

(१) 'स्वयंपाक आटोपून'च्या ऐवजी 'जेवण बनवून' : उदय प्रकाशांच्या गावाकडच्या कथा वाचताना/ अनुवाद करताना माझ्या डोळ्यांसमोर माझं सिंधुदुर्गातलं घर आणि गाव असतं. या संपूर्ण परिसरातल्या निदान बहुजनसमाजातल्या घरांत 'स्वयंपाक' हा शब्द कधीही वापरला जात नाही. 'थांब जरा, पाच मिनिटांत जेवण होईल, जेवूनच जा' अशा पद्धतीने दोन्ही अर्थांनी 'जेवण' शब्द आमच्या मुंबईतल्या घरात, नातेवाईकांत, गावी सर्व ठिकाणी वापरला जातो. अर्थात वरील ठिकाणी 'स्वयंपाक' हा शब्द मी हेतुपुरस्सर टाळलेला नाही. माझ्या नेहमीच्या वापरातून 'जेवण बनवून' आलंय.

'रसोई'चं भाषांतर करताना मात्र 'स्वयंपाकघर' मला सुसंगत वाटेना. मुंबईत त्याचं 'किचन'च झालंय. गावाकडे या जागेचा निर्देश फक्त 'चूल', 'चुलीजवळ आहे बघ' अशा तऱ्हांनी होतो. 'डबी' या कथेत मी त्याचं 'चूलघर' केलंय, तेही मला समाधानकारक वाटत नाही. वेंगुर्ल्याच्या वीरधवल परब या तरुण कवीने (तो आणि त्याचे मित्र मालवणी बोलीतल्या शब्दांवर काम करतायत) हल्लीच मला फारसा प्रचलित आणि वापरात नसलेला 'रांधापओवटी' (मालवणीत 'रांधप'चं 'रांधाप' झालंय) हा एक सुंदर शब्द यासाठी सांगितला.

(२) 'माकडा'साठी 'वानर' : इथे माझी थोड्या वेगळ्या अंगाने गफलत झालीय खरी. कारण पुन्हा आमच्या गावाकडे माकडांसाठी वानर, मालवणीत 'वांदर', हाच शब्द अजूनही वापरला जातो. आता एप्रिल-मे महिन्यांत आंबे खायला माकडाच्या टोळ्या गावात येतील. त्यांना पळवण्यासाठी कर्कश आरडाओरड आणि चीत्कार असलेल्या, मुद्दाम तयार केलेल्या कॅसेट्सचा वापर करतात. माकडं आल्याचं कळताच 'वांदर इले रे' किंवा 'वांदराँ इलीऽ' अशी 'हळी' दिली जाते आणि मोठ्या कर्ण्यातून या कॅसेटचं ध्वनिप्रक्षेपण करतात. उदय प्रकाशांच्या कथेत : 'जंगल में लंगूर बहुत होते थे । बल्कि लंगूर शब्द तो मैंने काफी बाद में सीखा, किताबों से । हम उन्हे काले मुँह का बंदर कहते थे ।' असं आहे, तिथे मी पुस्तकातून शिकलेल्या शब्दासाठी 'वानर' आणि 'आम्ही नेहमी म्हणायचो'साठी 'माकड' वापरलं आहे. ते खरं तर उलट असायला हवं होतं.

(३) आणखी एक गफलत माझी 'अरेबा-परेबा'च्या अनुवादात झालीय. या कथेतला मुलगा सशाच्या पिलांना 'रुई के फाहे से' दूध पाजतो, त्याचं मी कापसाच्या फाया केलंय. शब्दकोशानुसार ते बरोबर असलं तरी 'फाया' आपण अत्तराच्या संदर्भात वापरतो, 'बोळा' वापरणं जास्त योग्य ठरलं असतं, हे पुस्तक वाचल्यानंतर शब्दालय प्रकाशनाच्या सुमती लांडे आणि माझ्या 'लोकवाङमय गृहा'तल्या सहकारी माधवी विचारे यांनी माझ्या निदर्शनास आणून दिलं.

(४) 'हल्दिया'साठी वापरलेला 'हळदिवा' हा अत्यंत सुंदर आणि अर्थाच्या अनेक छटा असलेला शब्द मी घडवलेला नाही. आरती प्रभू यांच्या 'शून्य शृंगारते आणि होते हळदिवे' या ओळीतून मी तो घेतलाय.

■

इ-82, मोहननगर डहाणूकर वाडी, कांदिवली (प.), मुंबई 400 067.
दूरभाष : 022-29672060/9920103300

# ‘कोलन (:)’साठी मराठी प्रतिशब्द ?

- विजय पाध्ये

डॉ. मिलिंद मालशे ह्यांनी भाषा आणि जीवन २५:४/दिवाळी २००७ मधील आपल्या प्रतिसादात्मक लेखामध्ये ‘विसर्गचिन्हे’ अशी शब्दयोजना केलेली होती, ती पाहून मी आपल्या त्रैमासिकासाठी एक टिपण पाठवले होते. त्यानंतर ह्या शब्दप्रयोगा-संबंधी अधिक शोध घेणे इष्ट वाटले म्हणून निरनिराळे संदर्भग्रंथ, कोश पाहिले तेव्हा पुढील उल्लेख आढळले :

(१) महाराष्ट्र शासनाच्या भाषा संचालनालयाने प्रसिद्ध केलेल्या ‘राजभाषा परिचय’ ह्या ग्रंथात (पान १४) ‘द्विबिंदू’ असा शब्दप्रयोग केलेला आहे. शासनाच्या ‘शासन व्यवहार कोश’ ह्या मे १९७३मध्ये प्रसिद्ध झालेल्या, तसेच ‘शासन व्यवहार शब्दावली’ ह्या अगदी अलीकडे म्हणजे ऑगस्ट २००५मध्ये प्रसिद्ध झालेल्या कोशग्रंथांमध्येही हीच नोंद सापडते.

(२) राज्य मराठी विकास संस्थेतर्फे प्रकाशित करण्यात आलेल्या, डॉ० यास्मिन शेख ह्यांच्या ‘मराठी लेखन मार्गदर्शिका’ ह्या पुस्तकात विरामचिन्हांसंबंधीचा जो तक्ता दिला आहे (पान १०८), त्यात ‘अपूर्णविराम किंवा द्विबिंदू चिन्ह’ असा उल्लेख केला आहे. (आणि गंमत म्हणजे, त्याच पुस्तकातील आधीच्या ‘जोडाक्षरांचे लेखन’ ह्या प्रकरणात, विसर्गयुक्त शब्दांचे विवरण देताना ‘मराठीतील छेः, शीः, छ्याः अशा काही उद्गारांचे लेखन करताना विसर्ग - द्विबिंदू - देण्याची पद्धत आहे’ असे लिहून लेखिकेने माझ्यासारख्याचा गोंधळ उडवून दिला आहे.)

(३) मो.वि. भाटवडेकर ह्यांनी सिद्ध केलेल्या व अलीकडेच प्रकाशित झालेल्या ‘राजहंस व्यावहारिक मराठी शब्दार्थ कोशा’त ‘द्विबिंदू’ ह्या शब्दाचा अर्थ देताना (पान २९७) ‘:’ हेच चिन्ह दर्शवले आहे. ‘अपूर्णविराम’ ह्या शब्दाचा अर्थ स्पष्ट करताना (पान ३७) ‘वाक्याचा शेवटी पुढे तपशील देण्यात येत आहे असे दर्शविण्यासाठी उपयोगात असणारे चिन्ह’ असे म्हणून जे चिन्ह दिले आहे ते ‘:-’ असे !

(४) एन.बी. रानडे ह्यांच्या 'द ट्वेंटिएथ सेंच्युरी इंग्लिश-मराठी डिक्शनरी'च्या पहिल्या खंडात (पान ३६८), 'कोलन' ह्या शब्दाचा अर्थ 'विरामचिन्ह (:), द्विबिंदुचिन्ह' असा दिला आहे.

(५) 'मराठी विश्वकोश परिभाषासंग्रहा'मध्ये 'द्विबिंदु वर्गीकरण' हा शब्द इंग्रजीतील 'कोलन क्लासिफिकेशन'साठी योजण्यात आल्याचे दर्शवले आहे (पान ७५, पान २०३).

(६) कै० वासुदेव गोविंद आपटे ह्यांनी 'द इंग्लिश-संस्कृत डिक्शनरी'मध्ये 'कोलन' ह्या शब्दाचा अर्थ 'बिंदुयुग्मम्' असा दिला आहे (पान ८१).

(७) मो. रा. वाळंबे ह्यांनी 'मराठी शुद्धलेखन प्रदीप'मध्ये 'अपूर्णविराम' असा शब्दप्रयोग केलेला आहे.

(८) द.न. गोखले ह्यांच्या 'शुद्धलेखन-विवेक'मध्ये 'अपूर्णविराम' असे शीर्षक देऊन त्याखाली जे स्पष्टीकरण दिले आहे, त्यात अपूर्णविरामाबरोबरच 'उपपूर्णविराम' असा एक पर्यायी शब्दही दिला आहे (पान ९९). (हा पर्यायी शब्द मला कोणत्याही अन्य पुस्तकात आढळलेला नाही. 'विसर्ग' हा स्वरादी वर्ण-प्रकार आहे, ते अक्षरचिन्ह नव्हे असे प्रस्तुत पुस्तकातील 'परिवर्धित नियम' ह्या प्रकरणात (पान ४६-४७) म्हटले आहे.

(९) अरुण फडके ह्यांनी आपल्या 'शुद्धलेखन मार्गप्रदीप'मध्ये 'अपूर्णविराम' ह्याच शब्दाचा पुरस्कार केलेला आहे. परंतु मी श्री. फडके ह्यांच्याशी संपर्क साधून 'द्विबिंदुचिन्ह' ह्या शब्दाबाबत विचारणा केली तेव्हा 'अपूर्णविराम' ह्याऐवजी 'द्विबिंदुचिन्ह' किंवा 'द्विबिंदू' हा शब्द योग्य असून पुस्तकाची नवीन सुधारित आवृत्ती लवकरच प्रसिद्ध होत आहे, त्यात ही दुरुस्ती करू असे सांगितले.

अशा परिस्थितीत, 'कोलन'साठी अचूक व अधिकृत असा समानार्थी शब्द कोणता योजावा ? 'विसर्गचिन्ह' तर योग्य नाहीच; पण 'अपूर्णविराम' हा शब्दही अचूक आहे मला वाटत नाही. एक तर, स्वल्पविराम, अर्धविराम ही चिन्हे असलेले सगळेच वाक्यांश, पूर्णविराम (अथवा प्रश्नार्थक चिन्ह, उद्गारवाचक चिन्ह वगैरे) येईपर्यंत अपूर्णच असतात; आणि दुसरे म्हणजे एका बिंदूने प्राप्त होणारा पूर्णविराम, दोन बिंदू देऊनही अपूर्ण का राहावा ? ':' ह्या चिन्हाने पुढे आणखी काही विवरण संभवते आहे हे सूचित करण्यासाठी अधिक समर्पक चिन्ह सुचवता येईल काय ? ■

चित्रा 'बी', विद्यासागर सोसायटी, महेश सोसायटी परिसर, बिबवेवाडी,
पुणे 411 037. दूरभाष : (020) 24211951 / 9822031963

# शुद्धलेखनासंबंधी नवविचार ?

विजया चौधरी

मॉडर्न महाविद्यालय, पुणे, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई आणि मराठी अभ्यास परिषद, पुणे यांच्या वतीने 'मराठीच्या प्रमाणभाषेचे शुद्धलेखन : एक नवविचार' या विषयावर दिनांक २०-२१ फेब्रुवारी २००८ रोजी मॉडर्न महाविद्यालय, पुणे येथे राष्ट्रीय चर्चासत्र आयोजित करण्यात आले होते. २० फेब्रुवारीला उद्घाटन सत्र व दोन चर्चासत्रे, तर २१ फेब्रुवारीला एक चर्चासत्र अशी कार्यक्रमाची रूपरेषा होती. उद्घाटन सत्राचे प्रमुख पाहुणे प्रा.रा.ग. जाधव होते आणि चर्चासत्रांचे अध्यक्ष अनुक्रमे प्रा. प्र. ना. परांजपे, डॉ. कल्याण काळे व डॉ. आनंद यादव होते. तीनही चर्चासत्रांत मिळून २६ शोधनिबंध सादर झाले. चर्चासत्रांत सादर झालेला 'नवविचार' चर्चासत्राच्या संयोजक डॉ. स्नेहल तावरे यांनी एका टिपणाच्या स्वरूपात मांडला. ('भाषा आणि जीवन'च्या हिवाळा ०८ अंकात हे टिपण समाविष्ट आहे.) त्यात त्यांनी शुद्धलेखनविषयक नियमांचे सुलभीकरण केले जावे अशी अपेक्षा व्यक्त केली. त्याविषयीच्या आपल्या प्रतिक्रिया सर्व वक्त्यांनी आपल्या भाषणांत व्यक्त केल्या.

'लेखनाचे सुलभीकरण करावे' या तोडग्याला जवळजवळ सर्वच वक्त्यांनी विरोध दर्शवला. लेखनाचे सुलभीकरण हे आधारतत्त्व मानले तर लेखन व उच्चारण यांचा संबंधच नाहीसा होईल (कृष्ण श्री. अर्जुनवाडकर) किंवा सुलभीकरणाने लेखन सोपे होईल; पण त्यातील सूक्ष्म अर्थवत्ता हरवून जाईल (सत्त्वशीला सामंत) असे काही आक्षेप मांडले गेले. काही अपवाद वगळता महामंडळाने केलेले नियम योग्य असले तरी ते नीट शिकवले न गेल्याने गोंधळ निर्माण होतो असेही मत व्यक्त झाले. (जवाहर मुथा, मनोहर रोकडे इ.) अनुच्चारित अनुस्वार, अन्त्याक्षर व उपान्त्य अक्षरातील ई-कार व ऊकार, तत्सम व तद्भव शब्दांना दिली जाणारी स्वतंत्र वागणूक, जोडाक्षर लेखन याविषयींचे नियम बदलून त्यात सरलता आणणे गरजेचे आहे अशी प्रतिक्रिया बहुतांश वक्त्यांनी व्यक्त केली. तत्सम शब्दांना, तसेच परभाषेतून मराठीत आलेल्या शब्दांना मराठीचेच नियम लागू करावेत असा तोडगाही सुचविण्यात आला. लिपी सुधारणा, वर्णमालेमध्ये ॲ आणि ऑ यांचे स्थान याबाबतही विचार झाला.

उच्चारानुसार लेखन हे तत्त्व सरसकट लागू करण्याबाबत भिन्न प्रतिक्रिया व्यक्त झाल्या. मराठीमध्ये उच्चारकोशाची उणीव आहे. त्यामुळे उच्चारांची अचूकता किंवा ग्राह्यता ठरविण्याबाबत पेच निर्माण होईल असे विरोधी मत नोंदवले गेले.

'शुद्धलेखन' असी संज्ञा न वापरता 'प्रमाण लेखन' (प्र.ना.परांजपे), 'प्रमाणभाषेचे लेखनविषयक नियम' (नीलिमा गुंडी), 'लेखनाचे नियम' (यास्मिन शेख) 'लेखन संकेत' (कल्याण काळे) अशी काही संज्ञा वापरल्यास वैचारिक गोंधळ कमी होईल अशी शक्यता व्यक्त करण्यात आली. श्री. अरुण फडके यांनी महामंडळाने केलेले नियम पहिल्या नियमाचा अपवाद वगळता मराठीची प्रकृती लक्षात घेत नाहीत अशी टिप्पणी केली.

प्रा.रा.ग. जाधव यांनी शास्त्र व रूढी यांचा समन्वय साधून नैतिक व राजकारण-विरहित भूमिकेतून भाषेचे प्रमाणीकरण करणे आवश्यक आहे असे सांगितले. डॉ. आनंद यादव यांनी बी.एड. व डी.एड.च्या अभ्यासक्रमात शिक्षकांसाठी 'शुद्धलेखनाचे नियम' या विषयाची स्वतंत्र परीक्षा घेण्यात यावी अशी व्यावहारिक सूचना केली. या चर्चासत्राच्या माध्यमातून पुढे आलेल्या मुद्यांचा अभ्यास करण्यासाठी व त्यानुसार ठोस कार्यवाही करण्यासाठी एक समिती नेमण्याची सूचनाही त्यांनी केली.

या चर्चासत्राला महाराष्ट्रातून व महाराष्ट्राबाहेरील मिळून सुमारे ३०० प्रतिनिधी हजर होते. त्यात शिक्षकांव्यतिरिक्त सामान्य जिज्ञासूंचाही समावेश होता. मॉरिशसचे प्रा. गौरीया हलोराजन हेही चर्चासत्रास हजर होते.

या चर्चासत्राच्या पार्श्वभूमीवर तज्ज्ञांची एक समिती नेमली गेल्यास ती नियमांतील फेरबदलांबाबत महामंडळाकडे अहवाल सादर करू शकेल. महामंडळाने काही तज्ज्ञांकडे १० प्रश्न पाठवून त्यांच्या अनुषंगाने मते मागवली आहेत. त्या सर्व मतांचा विचार करण्यासाठी महामंडळ तज्ज्ञांची समिती नेमून तिच्या शिफारशी सरकारकडे पाठवेल अशी अपेक्षा आहे. सरकारने त्या शिफारशी स्वीकारल्या तर ते या चर्चासत्राचे साफल्य म्हणता येईल. ■

इ-503, राधिका सोसायटी, गार्डनव्ह्यू, सिंहगड रस्ता,
पुणे 411 030. दूरभाष : 24250559

(टीप : या चर्चासत्रात सादर झालेल्या काही निबंधांतील महत्त्वाचा भाग, मांडण्यात आलेले मुद्दे व संपादकीय दृष्टिकोण यांचा समावेश पुढील (पावसाळा, जून २००८) अंकात.

- संपादक





अनुक्रमणिका

# महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार २००८ : वितरण समारंभ

रंजना फडके

'मराठी अभ्यास परिषद' आणि 'बँक ऑफ महाराष्ट्र' यांच्या संयुक्त विद्यमाने १९८३ पासून उत्कृष्ट भाषाविषयक लेखनासाठी पुरस्कार दिला जातो. २००७चा 'महाबँक भाषाविषयक लेखन पुरस्कार (रु. ५,०००/-)' 'भाषाव्यवहार व भाषाशिक्षण', संपादक सुरेंद्र ग्रामोपाध्ये (कासेगांव एज्युकेशन सोसायटी, २००६) या पुस्तकाला सोमवार, २१ जानेवारी २००८ रोजी पुणे येथील एस.एम. जोशी सभागृहात ज्येष्ठ विचारवंत डॉ. चंद्रशेखर जहागीरदार यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. अध्यक्षस्थानी परिषदेच्या उपाध्यक्ष डॉ. मृणालिनी शहा होत्या.

कार्यक्रमाच्या प्रास्ताविकात कार्यवाह, डॉ. नीलिमा गुंडी यांनी संस्थेच्या उद्दिष्टांचा परिचय करून देताना गेल्याच वर्षी साजऱ्या झालेल्या रौप्यमहोत्सवी वर्षाचा उल्लेख केला; भाषाविषयक जागरण करणाऱ्या 'भाषा आणि जीवन' या त्रैमासिकाचे कार्य विशद केले; आणि व्याख्याने, चर्चासत्रे अशा इतर उपक्रमांचा संदर्भ देऊन ''मराठी भाषेचा विकास होण्यासाठी इतरांनीही पुढाकार घेतला पाहिजे.'' असे मत व्यक्त केले.

पुरस्कारार्थींची निवड आशा मुंडले, डॉ. अनघा भट आणि डॉ. विजया देव या परीक्षक समितीने केली होती. त्यांच्या वतीने प्रातिनिधिक स्वरूपात डॉ. अनघा भट यांनी मनोगत व्यक्त केले. त्या म्हणाल्या की, ''ज्येष्ठ समीक्षक रा.ग. जाधव यांची मार्मिक प्रस्तावना असणाऱ्या या पुस्तकात (ग्रंथामध्ये) लेखकांनी मातृभाषेची स्थिती आणि गती सांगत असताना अध्ययन - अध्यापन येथपासून भाषाव्यवहारापर्यंतचा व्यापक परिप्रेक्ष्य विचारात घेतला आहे. तसेच या ग्रंथामुळे वैचारिक अभिसरणालाही महत्त्व मिळेल असे त्याचे सामर्थ्य आहे.''

पुरस्कार-वितरण झाल्यानंतर पुरस्कारप्राप्त संपादक श्री. सुरेंद्र ग्रामोपाध्ये यांनी मनोगत व्यक्त केले. ''स्वत: विद्यापीठीय, भाषाविषयाशी संलग्न नाही; परंतु 'भाषाशिक्षण', 'भाषा व्यवहार' याबद्दल आत्मीयता आहे. इंजिनिअरिंगच्या विद्यार्थ्यांना शिकवत असताना संस्थेतर्फे 'तपस्या' या वार्षिकाच्या निमित्ताने विद्यार्थ्यांना

भाषाशिक्षणाबद्दल वेगळे अभ्यासपूर्ण लेखन द्यावे असा विचार मनात आला. त्यानुसार अनेक मान्यवरांचे लेख मिळवले आणि हा ग्रंथ सिद्ध झाला.'' असे त्यांनी सांगितले.

तौलनिक साहित्याचे समीक्षक, शिवाजी विद्यापीठातील इंग्रजी विभागाचे निवृत्त प्राध्यापक व विभागप्रमुख भाषाविषयक स्थित्यंतरांबद्दल जागरूक असणारे प्रमुख पाहुणे डॉ. चंद्रशेखर जहागीरदार यांनी सुरेंद्र ग्रामोपाध्ये यांचे मन:पूर्वक अभिनंदन केले आणि 'बँक ऑफ महाराष्ट्र'च्या सांस्कृतिक बांधिलकीचे कौतुक केले. ते म्हणाले, ''जागतिकीकरणात इतर भाषांचे आक्रमण मराठी भाषेवर होणार आहे. ते पचवून पुढे जावे लागेल. भाषेने विचार करायला शिकविले, तरच ती भाषा ज्ञानभाषा होईल; केवळ पुस्तकी शिक्षणाने हे साध्य होणार नाही. त्यासाठी इतरही प्रयत्न करावे लागतील.'' मराठी अभ्यास परिषद असे कार्य करीत आहे, असे त्यांनी आवर्जून सांगितले.

अध्यक्षीय समारोपात डॉ. मृणालिनी शहा यांनी ''मराठी अभ्यास परिषदेचे कार्य तरुणांपर्यंत पोहोचले पाहिजे'' असा विचार व्यक्त केला.

डॉ. विजया देव यांनी सर्वांचे आभार मानले. कार्यक्रमाचे सूत्र-संचालन विजया चौधरी यांनी केले. ■

**देणगी :**

वि. चिं. फडके (ठाणे) यांनी साहित्यिक मित्र डॉ. नरेश कवडी यांच्या स्मृतिप्रित्यर्थ संस्थेला रु. ५००/- ची देणगी दिली आहे. हा उपक्रम अनुकरणीय आहे.

**श्रद्धांजली :**

परिषदेशी संबंधित असलेल्या पुढील लेखकांचे दु:खद निधन झाले. त्यांना परिषदेतर्फे श्रद्धांजली.

(१) डॉ. य.दि. फडके
(२) प्रा. र.कृ. जोशी
(३) डॉ. राजेंद्र व्होरा
(४) प्रा. र.रा. गोसावी
(५) प्रा. वा.भा. जोशी.





अनुक्रमणिका

## भाषाविषयक लेखनसूची : २००७

-यशोधरा पवार

(टीप : ही सूची परिपूर्ण नाही याची आम्हाला जाणीव आहे. वाचकांनी आपल्या वाचनात आलेले संदर्भ कळवून ही सूची पूर्ण करण्यास हातभार लावावा अशी विनंती आहे. - संपादक)

**ओक**, अच्युत / 'मराठी भाषा सौजन्यपूर्ण आहे काय ?'/दै. सकाळ/१९ डिसेंबर

**काळे**, कल्याण/'ज्ञानेश्वरीच्या काव्यभाषेचा विकास'/'बापरखुमादेवीवरु'(मासिक)/ एप्रिल २००७ /खंड ७, अंक ७/पृ. ६३ ते ७७

**दांडेकर**, विश्वास/'शब्दांचे मोर आणि अर्थांची लांडोर'/दै. लोकसत्ता/९ डिसेंबर.

**बडवे**, नीती/'जागतिकीकरण आणि नवीन भाषा समीकरण'/दै. सकाळ लेख/११ डिसेंबर

**रसाळ**, शिवाजी / 'मराठी भाषा : चिंता आणि चिंतन'/'भारतीय शिक्षण' (मासिक)/ऑक्टोबर २००७/वर्ष ४० अंक १०/पृ. २३ ते २५

**सुराणा**, पन्नालाल/ 'भाषा, सरकार आणि साहित्यिक लेख'/दै.सकाळ/११ फेब्रुवारी

**हळबे**, मालती/'शुद्धलेखन आणि व्याकरण-विषयक परिभाषा : एक तौलनिक अभ्यास'/मराठी संशोधन पत्रिका/जाने-फेब्रु-मार्च २००७/वर्ष ५३, अंक ४/पृ. ३० ते ५२

**हळबे**, मालती/ अनुस्वार/ लेख/ मराठी संशोधन पत्रिका/एप्रिल-मे-जून/वर्ष ५३, अंक ३/पृ. ४४ ते ४६

(वरचे दोन्ही लेख म्हणजे अरुण फडके यांनी सुधारून वाढवलेल्या 'मराठी शुद्धलेखन प्रदीप' या पुस्तकाच्या आवृत्तीवरील परीक्षणात्मक टीका आहे.)

### वाचकपत्रे :

**गुंजाळ**, नीलकंठ /'सेमी इंग्रजीच चांगले' /दै.सकाळ/२० ऑक्टोबर

**दुर्गे**, भगवंतराव/'अट्टाहासच हवा'/दै. सकाळ/११ डिसेंबर

**दौंडकर**, पवन/'मराठी माध्यमाचा फायदा' /दै. सकाळ/१६ ऑक्टोबर

**पाटील**, अभय/'मुंबई विद्यापीठाची मराठी द्वेषबुद्धी'/दै. महाराष्ट्र टाइम्स/१३ डिसेंबर

**मुळगुंद**, विद्या/'वाहिन्यांवरील मराठीची परवड'/दै.लोकसत्ता/२७ ऑक्टोबर २००७

**राजे**, वसंत/'शासन व्यवहारात मराठीचा वापर'/दै. लोकसत्ता/२१ डिसेंबर

**सुर्वे**, नंदा/'मराठी जपा, सांभाळा'/दै. सकाळ/९ फेब्रुवारी

**स्वादी**, अजय/'मराठीतच बोलावे'/दै. सकाळ/९ फेब्रुवारी

| सदरे : | नवीन पुस्तके : |
|---|---|
| **बरखडे**, भागा/डॉ. के. एस्. राज्यश्री यांच्याशी संवाद/'छोट्या भाषा टिकल्या पाहिजेत'/ दै. सकाळ/११ डिसेंबर/ पृ. ७ | **बोकिल**, शांताराम / 'मराठीचा विकास व शिक्षणाचा प्रश्न'/कोल्हापूर/अभिनंदन प्रकाशन/२००७ /पृ. १०८ /मूल्य १००<br>**शेख**, यास्मिन / 'मराठी शब्दलेखन कोश' मनोविकास प्रकाशन/२००७ /पृ. ४५६ /मूल्य ३०० |

खोली क्र. 12 आनंदनिवास वृद्धाश्रम, महर्षी कर्वे स्त्रीशिक्षण संस्था, कर्वेनगर, पुणे 411052.

# चुकीची दुरुस्ती

लेखातील पुढील चुका/मुद्रणदोष कृपया सुधारून घ्याव्यात :

वर्ष २५ : अंक ४, दिवाळी २००७

| | **चूक** | **बरोबर** |
|---|---|---|
| पृ. ६ खालून ओळ ३ | हितसंचक | हितचिंतक |
| पृ. २७ खालून ओळ १७ | नोम | नोअम |
| पृ. ४२ ओळ १० | स्त्री लेखिका | लेखिका |
| पृ.८८ ओळ २५,२६,२७ | साहित्याचे... नियतकालिकांतून प्रकाशित | (हा मजकूर वगळणे.) |

वर्ष २६ : अंक १, हिवाळा २००८

| | **चूक** | **बरोबर** |
|---|---|---|
| पृ. २ ओळ १२ | संस्थेला असू नये; त्या(ति)ने पत्राने | संस्थेला असू नये; उमेदवाराला उमेदवारी-अर्ज भरावा लागू नये; त्या(ति)ने पत्राने |
| पृ. ३ ओळ १ | करा | करावा |
| पृ. २१ खालून ओळ ५ | वाड्निश्चय | वाङ्निश्चय |
| पृ. ३५,३७,३९ पृष्ठ-तळ | 'आर्यभगिणी'तील | 'आर्यभगिनी'तील |
| पृ. ३५ खालून ओळ ३ | नियतकलिक | नियतकालिक |
| पृ. ७२ खालून ओळ २ | स्त्री विकासाच्या | स्त्रीविकासाच्या |

लेखक परिचय

- केशव सखाराम **देशमुख :** वाङ्मय पुरस्कार निवड समितीचे सभासद. जालना येथील श्रीमती दानकुंवर महिला महाविद्यालयात प्राध्यापक. अकरावीच्या मराठी पाठ्यपुस्तकाचे संपादक-सदस्य. 'पाढा' हा कवितासंग्रह व दोन संपादित पुस्तके प्रकाशित.
- अरुण **देवरे :** कल्याण येथील बिर्ला महाविद्यालयात मराठी-विभाग प्रमुख. 'व्यावहारिक मराठी', 'डंजर बिंजर राक्षस', 'चिकी आणि निकी' (बालनाटिका) अशी तीन पुस्तके आणि म.टा, लोकसत्ता, आनंद, किशोर, टॉनिक या मासिकांतून बालकविता प्रकाशित...
- यशोधरा **पवार :** एम.ए.(मराठी), एम.ए.(हिंदी). ग्रंथालय शास्त्राची पदवी. श्री.ना.दा.ठा. शाखा ग्रंथालयातून निवृत्त. वृत्तपत्रांमध्ये लेखन.
- डॉ. रामचंद्र **पाटकर :** विल्सन महाविद्यालय, मुंबई येथून मराठी-विभाग प्रमुख म्हणून निवृत्त. 'आत्मचरित्र : एक साहित्य प्रकार' या विषयावर पीएच.डी. 'कलेचा इतिहास : भारतीय आणि पाश्चात्य', हे पुस्तक महाराष्ट्र राज्य कला संचालनालयाने प्रकाशित केले. माधव सातवळेकरांच्या चित्रसंग्रहात सातवळेकरांची दीर्घ मुलाखत समाविष्ट. प्रा. बाबुराव सडवलेकरांच्या लेखसंग्रहाचे ('महाराष्ट्रातील कलावंत : आदरणीय आणि संस्मरणीय') संपादन. 'शहीद भगतसिंग : आठवणी, विवेचन आणि विचार' 'मराठी नियतकालिकांतील दृश्य विचार' ही अन्य पुस्तके. कथा, कविता, साहित्यसमीक्षा यांचे लेखन.
- रंजना **फडके :** वाडिया महाविद्यालयात अध्यापन. कवयित्री. अनेक संस्थांमध्ये सहभाग.
- विवेक **भट :** रासायनिक अभियंता. वयाच्या पन्नाशीनंतर संस्कृत व भाषाविज्ञान या विषयांत एम.ए. सध्या भाषाविज्ञानात पीएच.डी.साठी संशोधन.
- डॉ. मिलिंद **मालशे :** आय. आय. टी. पवई (मुंबई)मध्ये इंग्रजीचे प्राध्यापक. मराठी व इंग्रजीमधून लेखन. सौंदर्यशास्त्राचेही अध्यापन.'आधुनिक भाषाविज्ञान : सिद्धान्त आणि उपयोजन', 'आधुनिक समीक्षा-सिद्धान्त' इ० पुस्तके प्रकाशित. हिंदुस्थानी शास्त्रीय संगीताचे अभ्यासक व गायक.
- वासुदेव सोमाजी **वले :** शेठ मु. मा. महाविद्यालय, पाचोरा (जि. जळगाव) येथे मराठीचे प्राध्यापक.
- सत्त्वशीला **सामंत :** महाराष्ट्र राज्यशासनाच्या भाषा-संचालनालयाच्या निवृत्त उपसंचालक. 'व्याकरणशुद्ध लेखनप्रणाली' हे पुस्तक प्रकाशित.
- विनय **सायनेकर :** सर ज.जी. उपयोजित कला महाविद्यालयात अध्यापन. 'भारतीय लिप्यांचे संगणकावर संकलपन' हा अभ्यासाचा विषय व त्यात व्यावसायिक स्तरावर कार्य.

---

(१) वार्षिक वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. वार्षिक वर्गणी - संस्थेला रु. १२५/-. पंचवार्षिक वर्गणी रु.५५०/-. व्यक्तीला रु.१००/-. पंचवार्षिक वर्गणी रु.४५०/-. परदेशात अंक पाठविण्यासाठी टपालखर्च रु. १००/- अधिक.

(२) मराठी अभ्यास परिषदेची **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) वर्गणी रु. १,००० आणि नोंदणी शुल्क रु. १००/-.** आजीव सदस्यांना 'पत्रिके'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये.** (पाठवल्यास आपला पत्ता न विसरता लिहावा.) धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. **धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत रुपये ५०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जाहिरातीसाठी नवे दर :** पूर्ण पान रु. २,५००, अर्धे पान रु. १,५००, पाव पान रु. ८००, शुभेच्छा रु. ४००/-, आवरण पृष्ठ तीन रु. ३,०००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम. हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.




**कोणासाठी** मनोमिती किती कोन पट लावे
**कोणासाठी** किती रिते प्याले पुन्हा असंडावे
**कोणासाठी** किती काळ ओलवावे कोरा डोळे
**कोणासाठी** पानोपानी करावे ते किती काळे
**कोणासाठी** डोळ्यांत किती नाचावी शाहुली
**कोणासाठी** सहागरी भर दुपारी माऊली
**कोणासाठी** कुठे कुठे पाप ओढीत ने गावे
**कोणासाठी** अंतराळ चिर्नाचिर्नाने कापावे
**कोणासाठी** आळवावे सनगुणी एक गाणे
**कोणासाठी** किती वेळा कोणी बदलावे नाणे
**कोणासाठी** किती वेळा कोणी उतरावे उर
**कोणासाठी** मोहराची कोण-मनी हुरहूर
**कोणासाठी** कोणना मी कोणासाठी हे जगणे

कोणा एका रणे आप्या किती आस देणे

को? णा? सा? ठी

हे ह्याच्या शेवटच्या च्या मुरवातीत मिळवतोय
इथल्या निरंभाळल तिथल्या मीलनाची धेतोय
भरतोय गंध विसंवणाऱ्या फुलाऱ्यान
नि मिटणाऱ्या क्षणांत तेजोमय प्रारंभ
मोजतोय पूर्णांक अपूर्णांकाच्या आळ्या घेत
मापतोय खोली कविता टी विंदत
भोगतोय अनेकमित केल्या निरर्थक कंमात
ही नर मुरवात शेवटच्या शब्दात.

प्रेषक
कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद
८, अन्नपूर्णा, १२५०, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, गल्ली क्र. ७
वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. (दू. क्र. २४४८६०१५)